# नवा नमुना

[ सामाजिक कादंबरी ]

विठ्ठल कृष्ण नेरूरकर




★ २७ ★

मूल्य दोन रुपये

# नमुन्याची वानगी

महाराष्ट्रांतील चतुर वाचकांसमोर आज मी वाङ्मयांतील विचार-प्रवाहाचा ' नवा नमुना ' ठेवीत आहें. आज जे क्रांतीचे वारे वाहात आहेत, त्यांतीलच हा एक वातप्रवाह आहे. जो जमीनदार कुळांकडून केवळ खंड घेऊन राहाणारा असेल, त्याला यापुढें तग धरतां येईलसें वाटत नाहीं. जमीनदारानें स्वतः शेतकरी तरी व्हावें, अगर आपल्या कुळांशीं वागण्याची पद्धत तरी बदलावी. लहान लहान खातेदारांस कुळांनीं संप करून अडविलें असतां खातेदारानें स्वतःच जमिनीची कसवट करावयास सुरुवात करावी. तशांत त्याला शेतीशास्त्राचें ज्ञान असलें तर त्याचें शेत हें गांवांतील इतर शेतकऱ्यांस सुधारलेल्या शेतीचे धडे घ्यावयास आदर्शवत् होईल व त्यामुळें सबंध गांवाचा फायदाच होईल. प्रस्तुत कादंबरींत एवढेंच तत्त्व व्यवहारांत आणण्याचा नमुना दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

याच तत्त्वाचा जो दुसरा भाग म्हणजे कुळाशीं वागण्याची पद्धत म्हणजे स्वतः शेती न करतां कुळांनाच हातीं धरून उद्धरणें, त्याच्या विशदी-करणासाठीं नुकतेंच मीं " चंद्रभुवन " म्हणून नाटक लिहून पुरें केलें आहे व त्यावरून कादंबरी लिहिण्याचा विचार आहे.

प्रत्यक्ष कादंबरीच्या कथानकाबद्दल आम्हांला कांहींही लिहावयाचें नाहीं. आमचा चोखंदळ वाचकवर्ग वानगीचा स्वाद घेऊन नमुना कसा आहे हें ठरवील याबद्दल मला पुरी खात्री आहे.

वि. कृ. नेरूरकर

प्रकरण पहिलें

# नांगऱ्या आणि लेखण्या !

" कोयती पाहिजे होती. "

हे तिचे शब्द ऐकून तो आपल्या विचारतंद्रींतून एकदम जागा झाला. ती जमिनीवर पाठमोरी बसून भुतामांचे रोपटे न्याहाळीत होती. प्रथम तिनें कांहीं भुतामें तोडलीं, पण नंतर तिला त्यांतले कांहीं रोपटेच काढून घ्यावेसे वाटले. म्हणून तिनें म्हटलें,

" कोयती पाहिजे होती, आहे का तुमच्या जवळ ? "

ती पाठमोरी बसली असतांना तिच्याकडे त्याची सारखी नजर लागून राहिली होती. तशा प्रकारची बैठक कोणतीही कॉलेजकुमारी घालणें शक्य नाहीं. उच्च शिक्षण घेणारी शहरची मुलगी, नुकतेंच कांहीं दिवसांपूर्वी भात कापल्यामुळें पायांला टोंचणाऱ्या बुडख्यांत, शेतांत राबणाऱ्या कष्टाळू शेतकरिणीप्रमाणें लुगडें आवरून घेऊन भात किंवा गवत कापायला बसतात तशी बसलेली जर का एखाद्या कॉलेजच्या जवानाला दिसली, तर त्याच्यानें तें दृश्य कुतूहलानें पाहावल्याशिवाय राहावेल कसें ?

तिचा प्रश्न ऐकतांक्षणींच त्यानें आपली नजर तिच्यावरून दुसरीकडे वळविण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. त्याला वाटलें, ती मागें मान वळवून कदाचित् पाहील, म्हणून तो ओशाळला होता. पण त्याची भीति अनाठायीं होती. तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. करवंदांएवढाल्या लोकरी झेंडूप्रमाणें हाताला मऊ मऊ लागणारीं व लोकरीच्या बटणांप्रमाणें—गुंज्यांप्रमाणें मळकट जांभळ्या रंगाचीं दिसणारीं तीं रासवट फुलें तोडण्याच्या व्यवसायांत ती फार मग्न झाली होती. तिचे वेणींत न सापडलेले खेळकर चोरटे केस वाऱ्याच्या तरंगांबरोबर भुरुभुरु उडत होते. नितंबभागापर्यंत रुळणारा वेणीचा शेपटा या वेळीं भाताच्या बुडख्यावर स्थिरावला होता. तो तेथून उचलला तर बरें असें त्याच्या मनांत अनेक वेळां येऊन गेलें. मावळत्या सूर्याचे कोमल किरण तिच्या डाव्या कुशीवर पडले होते. शेडलाइटचें काम दाखवायला चित्रकाराला तें उत्कृष्ट मॉडेल होतें. डावीकडची आकृतिरेखा प्रकाशांत असल्यामुळें त्या रेखेवर येणारे उन्नत भाग चक्क प्रकाशांकित व निम्न भाग छायांकित दिसत होते. उजवीकडची आकृतिरेखा अर्थातच प्रकाशाला मुकली होती. म्हणून पाहाणाराला निम्नोन्नत भाग दिसणें अशक्य नव्हतें.

उलटपक्षीं पांढुरक्या ढगांचा एक मोठा समूह पू  । आकाशाच्या मध्यभागीं तरंग चालला होता; आणि आत्तांच सूर्याच्या आड अ. ल्या एका काळसर ढगानें अडवू धरलेल्या सूर्यकिरणांचा प्रकाश त्या ढगांच्या पृष्ठभागांवरून परावर्तित होऊन त्याच्य योगानें सारेंच वातावरण उजळ झालें होतें. अशा प्रकारचा निष्किरण प्रकाश फार बहारदार असतो व त्या उजाळ्यानें उज्ज्वल झालेलें वातावरण अत्यंत आकर्षक व प्रस दिसतें. तो तरुण तिच्या पृष्ठभागावरील डाव्या खांद्यावरून खालीं उतरलेल्या, प वाऱ्याबरोबर चळणाऱ्या पदराचे चाळे सोत्सुक नयनांनीं अवलोकन करीत होत त्यामुळेंच त्याच्यानें प्रश्नाचें उत्तर चटकन् देववलें नाहीं. म्हणून तिनें पुन्हा एकदां म्हटले

" कोयती पाहिजे होती हो ! "

या खेपेस मात्र तिनें मागें पाहिलें. त्याबरोबर त्या तरुणाची तृषार्त नजर तिल दिसली. तिच्या कपाळावर आंठ्या चढल्या, त्या तिनें दिसूं दिल्या नाहींत, तर पण त्या तरुणाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिल्या नाहींत. शैलाला नाखूष झालेलं त्याच्यानें कसें पाहावेल ?

" कोयती ? " त्यानें विनोदानें तिला खुलविण्यासाठीं म्हटलें, " कोयती ? कोयत कशाला मागतां ? चाकू मागा, सुरीही मागितलीत तरी हरकत नाहीं. वास्तविक म्हट तर माझ्याकडे, माझ्यासारख्या शूराकडे तरवारच मागायची. तर सगळं सोडून कोयती ! "

" आहा हा हा ! काय पण शूर ! यू. टी. सी. चा कोर्स पुरा करायला केव जिकीर पडते तुम्हांला ! सदाची कुरकूर, " असें म्हणत ती उठली आणि उडव्याव चढून त्या तरुणाच्या समोरच बसली. त्यामुळें त्याचा नाइलाज झाला. या क्षणीं विशिष्ट प्रकारच्या उजळ वातावरणांत तिचें आंगोपांग न्याहाळून पाहायची त्याची अतृप्त राहिली होती. ती गोष्ट तिच्या नजरेआडच साध्य झाली असती. ती आज कुठून नवखी अशी आली नव्हती. रोजच्या पाहाण्यांतली असूनही आज ति सौंदर्यांत त्याला विशेष जादू वाटत होती. ती त्या विशिष्ट प्रकारच्या उजळ वाताव मुळेंच काय ? तो त्या कारणाचा आपल्या मनांत शोध घेत होता.

" कोण, कोण म्हणतो असं ? बहुतेक त्या साखरदांड्यानं सांगितलं असेल तुम्ह तो आपल्या प्रतिस्पर्ध्याचा संशय घेऊन म्हणाला, " त्या साखरदांड्याला मी ए चांगलाच दंडावणार आहे " असें म्हणून त्यानें आपल्या केसांच्या भांगावरू हात फिरविला.

पुन्हा विषयपालट करण्याकरि[illegible]त्यानें मग म्हटलें,

" खरंच आज कोयतीची काय एवढी जरूर होती ? "

शैला या वेळीं भुतामांचा गुच्छ करून त्याचा वास घेण्यांत व त्या गुच्छाचें सौंदर्य पाहाण्यांत दंग झाली होती.

इतक्यांत पश्चिमेला तांबड्या जांभळ्या रंगांचें केवढें तरी मोठें जाळें पसरून वातावरणांतल्या उजाळ्याला जांभळेपणा आला होता. रंगभूमीवर काळोख करून, नंतर एकाद्या नायिकेवर निरनिराळ्या रंगांचा प्रकाश टाकावा व त्या प्रकाशांत ती सुस्वरूप नायिका जशी खुलून दिसते त्याच्याहूनही शैला शेखरच्या नजरेला आकर्षक दिसत होती या वेळीं.

" हें पाहा शेखर, मला शेतांत काम करावंसं वाटलं. त्या भाताच्या बुडख्यांत एक आवा कापायचा चुकून राहिला होता. मला तो कोयतीनं कापावासा वाटला ! " हें वाक्य म्हणत असतां तिनें मान हालवून डाव्या हातांत धरलेलें गवत उजव्या हातानें [illegible]ापण्याचा जो आविर्भाव केला तो प्रेक्षणीय होता. " कोयती सापडली असती तर [illegible] वासराकरतां थोडंसं कोवळं लुसलुशीत गवतदेखील कापलं असतं. "

" तर मग आपण आर्टस् कोर्स न घेतां शेतकी कॉलेजांत जायला पाहिजे होतं, " [illegible]खर म्हणाला. पण त्याचें वाक्य पुरें झालें नव्हतें. तें पुरें करण्याकरितां तो पुढें [illegible]णाला, " त्या नांगऱ्यासारखं ! "

" त्या नांगऱ्यासारखं " हे शब्द उच्चारतांना त्याच्या बोलण्यांत पूर्ण हेटाळणी [illegible]ली दिसली. एकाद्याच्या पश्चात् त्याची हेटाळणी करणें शैलेला कधींच आवडत [illegible] शेखर म्हटलें तर मोठा धोरणी माणूस. पण त्याचें धोरण आज चुकत होतें. [illegible]या एकान्ताचा योग या ऑक्टोबर व्हेकेशन्च्या रजेंत त्यानें मुद्दाम जुळवून आणला [illegible]ग त्याचा त्याला फायदा घ्यावयाचा होता. पण सुरुवात कशी करावी हें त्याल[illegible] [illegible]तां येत नव्हतें अजून. डाव हुकणार नाहीं अशा प्रकारें त्याला अचूक टाकावयाचा [illegible]ण आपल्या बोलण्यांत पुन्हा चूक होऊन शैला नाखूष झाली हें त्याच्या लक्षांत आलें.

[illegible]ठला नांगऱ्या म्हणालांत शेखर तुम्ही ? " शैलेनें विचारलें.

[illegible]ला का असेना ? आज तुमची तबियत ठीक दिसत नाहीं. रजा संपायला [illegible]राच दिवस राहिले. अभ्यास तर कांहींच झाला नाहीं. आतां हें सीनियर [illegible]रीक्षेचं वर्ष ! ' "

" परीक्षेचं वर्ष " म्हटल्याबरोबर मात्र शैलेचा चेहरा किंचित् सस्मित झाला. ती अर्धवट स्वतःशींच अशी गुणगुणूं लागली.

सर्व पुस्तकें बॅग भरोनी
वसणें वाचनमिषा करोनी
पुस्तक वदनाआड धरोनी
मज बघायचें । परी
वरुष परीक्षेचें ।।

तिचा हा चरण म्हणून संपतांच ती शेखरकडे पाहूं लागली. शेखरला पाहिजे होती ती संधि मिळाली.

" पण माझी घरीं वाट पाहायला, माझं कुठं लग्न झालं आहे ? "

त्यावर कोणींच कांहीं बोललें नाहीं.

" खरं म्हटलं तर हें गाणं आतां ' आउट ऑफ डेट् ' झालं आहे. विवाहित विद्यार्थी कॉलेजांत जात असत, त्या वेळचं हें गाणं आहे. आतां कॉलेजांत अविवाहित विद्यार्थीविद्यार्थिनी बहुतकरून असतात आणि कॉलेजांत प्रेम जमल्यानंतर विवाह घडून येतात, " शेखर म्हणाला.

" तुमचंही जमलं असेल ना प्रेम एखाद्या कॉलेज-कुमारीबरोबर ? " शैलेनें स्वतःचा खालचा ओंठ दाबीत व दुसरीचकडे पाहात विचारलें.

" हो ! माझं प्रेम आहे एका कॉलेजकुमारीवर, पण तिच्या प्रेमाचा लाभ मला मिळेल कीं नाहीं हेंच मला कळत नाहीं. " हें बोलत असतांना त्याची नजर अस्थिर झाली होती व नाडीचे ठोके जरा जलद पडूं लागले होते. त्याचा आधींच असलेला गौरवर्ण चेहरा किंचित् तांबूस होऊन पुनः विवर्ण झाला. मात्र उत्तराची अपेक्षा करीत समोर पाहाण्याचें धैर्य न झाल्यामुळें, तो दुसरीकडेच पाहूं लागला होता.

" कां बरं ? तिच्या प्रेमाचा मागमूस लागत नाहीं वाटतं ?"

" छेः ! मीं कितीही सूक्ष्मपणानं पाहिलं, तरी तिच्या प्रेमाचा ठावठिकाणाच ला[illegible] नाहीं. तिच्या प्रेमाला भुकेलेले जीव पुष्कळच आहेत. पण तिच्या प्रेमाचा मात्र कोणालाच लागत नाहीं. "

" तर मग सरळ तिलाच कां विचारीत नाहीं ?"

आतां मात्र तिनें शेखरच्या चेहऱ्यावर नजर सारखी रोंखून धरली होती. शेखरचा चेहरा मूळचाच नाजूक व गौरवर्ण. तशांत त्यानें भांग पाडण्याची व केसांची जी पद्धत स्वीकारली होती, तिच्यामुळें त्याचा चेहरा आकर्षक दिसे खरा, पण तो झनानीपणाच्या झाकेमुळें आकर्षक दिसत असे. तिला काय वाटलें कुणास ठाऊक, आपल्या खिशांतून कीं कुठूनसा ल्हानसा एक आरसा काढला व त्यांत तिनें आपलें रूप एका निमिषार्धांत पाहून घेतलें. दाखवायला मात्र कपाळावरचे केस बाजूस सारल्याचा निव्वळ बेमालूम बहाणा केला.

" होय, आतां तसंच करायचा माझा विचार आहे. "

" आतां म्हणजे केव्हां ? "

" आतां म्हणजे आत्तांच ! "

" म्हणजे कॉलेज उघडायच्या आधींच ? "

" कॉलेज उघडण्याची वाट कशाला पाहायला हवी ? "

" कॉलेज उघडल्याशिवाय तुमची प्रणयिनी तुम्हांला भेटणार कशी बाई ? "

" जिला मीं प्रेम वाहिलं आहे, ती माझी प्रणयदेवता अगदीं माझ्यासमोरच बसली आहे, " त्यानें कसें बसें म्हटलें व तो आतुरतेनें तिच्या उत्तराची वाट पाहूं लागला.

" म्हणजे मला का तुम्हीं आपलं प्रेम वाहिलं आहे, शेखर ? मोठी गंमतच म्हणायची ! " ती निर्विकार मनानें मोठ्यानें हसली.

शेखरच्या काळजाचें पाणी होऊन गेलें. तो खजील झाला. कुठली झक मारली आणि आपण आपला प्रेमाविष्कार केला असें त्याला होऊन गेलें.

" तुम्ही वाईट वाटून घेऊं नका शेखर, " ती हातांतील भुतामांचा एक ल्हानसा गुच्छ करून तो केंसांत अडकवीत म्हणाली. शेखरचा जीव खालीं पडला.

" पण मला शहरच्या जीवनाचा वीट येऊं लागला आहे, " ती आपलें बोलणें पुरें करीत म्हणाली, " मला दिवसेंदिवस कृषिजीवन आवडूं लागलं आहे. "

" हं: ! गांधींचे लेख वाचल्याचा परिणाम ! " शेखरनें टोमणा मारला.

" छट् ! "

" तर मग प्रोफेसर लवंगे यांच्या चर्पटपंजरीचा परिणाम ! "

" अं हं ! "

" मग एकाद्या नांगऱ्याच्या फोटोच्या दर्शनानं किंवा त्याच्याबद्दलच्या तिखटमीठ लावून केलेल्या वर्णनामुळं अशी ही तुमची दिशाभूल होत असली पाहिजे खास ! " शेखर ठासून म्हणाला.

शैलेच्या भ्रुकुटी वक्र झाल्या. सूर्य केव्हांच अस्तास गेला होता. नदीकांठच्या नारळीवरील घरट्यांकडे पाखरें धाव घेत होतीं. तिनिसांजची कातर वेळा म्हणतात ती हीच. शैलेला खरोखरच शेखरचा राग आला होता. ॲग्रिकल्चर् कॉलेजच्या विद्यार्थ्यांना आर्टस् कॉलेजचे विद्यार्थी ' नांगरे ' म्हणून संबोधीत असतात. एक काळ असा होता, कीं जेव्हां आर्टस् कॉलेजच्या ग्रॅज्युएटची किंमत नोकरीच्या बाजारांत चढती होती. पण आतां बी. ए. ला कोणीच विचारीत नाहीं. विचारीत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तो एक थट्टेचा विषय होऊन बसला आहे. शेखरला आजच्या पालटलेल्या या परिस्थितीचें ज्ञानच नव्हतें काय ? कीं त्याला शैलेच्या मनाची खोली अजमावून पाहावयाची होती ? दुसऱ्याला हिणवणें शैलेला आवडत नसे. शेखरनें आतांच्या आतां दुसऱ्यांदा हा अप्रयोजकपणा केलेला होता. ' नांगऱ्या ' ' नांगऱ्या ' म्हणून तो कोणाचा उपहास करीत होता, हें तिला आतां तर पूर्णपणेंच कळून चुकलें. ती कांहीं तरी बोलणार, इतक्यांत शेजारच्या झाडावर कांहीं तरी सळसळल्याचा तिला भास झाला, म्हणून तिनें त्या झाडाकडे पाहिलें. शेखरही तिकडेच पाहात होता. तें झाड पानांनीं गच्च झांकलेलें होतें. त्याच्यावरून एक वाळलेली काटकी खालीं पडली. तें जगमीचें झाड असावेंसें दिसलें. या दिवसांत जगमें चांगलीं पिकलेलीं असतात. पण आतां काळोख पडणार होता, म्हणून शैलेनें आपली त्या झाडावर हल्ला करण्याची इच्छा तशीच दाबून ठेवली.

दोन वर्षांपूर्वी पुणें व मुंबई येथील कॉलेजांतील इंटर कॉलेज स्पोर्टस् झाले होते. त्यांतील दोन तीन मर्दानी खेळांत पहिला आलेला एक ॲग्रिकल्चर कॉलेजचा विद्यार्थी पोहण्यांत देखील पहिला आला होता. त्या वेळीं रेकॉर्ड ब्रेक करण्याची जी एक लाट आली होती, तिच्यांत त्या विद्यार्थ्यानें दक्षिण हिंदुस्थानांतील पोहण्याचा विक्रम केला होता. त्याचे निरनिराळ्या ' पोझिस् ' चे फोटो अनेक कॉलेजांतून ठेवण्यांत आले होते. तो ज्या वर्षी बी. ए. पास होऊन गेला, त्याच वर्षी शैला कॉलेजांत गेली होती. पण शैलेच्या मैत्रिणींच्या बोलण्यांत, स्पोर्टस्च्या दिवसांत त्या गोष्टी फिरून फिरून येत असत.

तेव्हां त्या विद्यार्थ्यांबद्दलची माहिती एकदां सहज म्हणून शैलेनेंच शेखरला विचारली होती. तो विद्यार्थी—पण आतां विद्यार्थी कसला म्हणा—आपल्याच गांवचा आहे असें कळल्यावर तर शैलेची उत्सुकता फारच वाढली होती. त्याच्याविषयीं प्रेमभावना शैलेच्या हृदयाच्या कुठल्यातरी एकीकडच्या कप्यांत दबा धरून बसली असल्यास तिचा थांग शेखरला घ्यावयाचा होता. म्हणूनच त्यानें आज असा हा दोनदांचा अप्रयोजकपणा जाणूनबुजूनच केला होता.

" शेखर ! तुम्ही नांगऱ्या या नांवानं ज्याचा उल्लेख करतां तो खरोखरच हिंमतवान् आणि समयज्ञ गडी असला पाहिजे. पण लेखण्या गडी आजकाल नांगऱ्या गड्यापेक्षां काय उजेड पाडतोय् हो ? "

" तुम्ही अर्थाचा अनर्थ करताहांत. मी स्वतः लेखण्या गड्याविषयीं बिलकूल आदर बाळगीत नाहीं. मी स्वतः तर नांगऱ्याही नाहीं आणि लेखण्याही नाहीं. माझें सारें ध्येय कलोपासना हें आहे. तुम्ही उगीच गैरसमज करून घेत आहांत. "

" टाळाटाळ कशाला करतां ? इथं कोण ऐकायला येऊन बसलं आहे ? तुम्ही ' हलधरां ' ना नांगऱ्या म्हणत आहांत, हें चोरून कशाला ठेवतां ? "

" तुम्हांला तसं म्हणायचं असलं, तर खुशाल म्हणा. पण मला तुम्हांला एकच विचारायचं आहे, कृषिजीवनाकडे जो तुमच्या मनाचा इतका ओढा, तो कशामुळं ? काय त्यांत तुम्हाला इतकं रमणीय वाटलं ? "

" तें सांगून यायचं नाहीं. मी आतां तुमच्याकडे कोयती मागितली ना ? एखाद्या शेतकऱ्यानं जर ती मला दिली असती, तर मीं दाखविली असती गंमत करून. कॉलेजचं शिक्षण घेऊनही हिंदुस्थानच्या तरुणांनीं शेती आणि उद्योगधंदे यांकडे वळलं पाहिजे. त्याशिवाय आतां तरणोपाय नाहीं. शेतांत काम करावं; गुरंढोरं पाळावीं, दूधदुभतं करावं, मेहनत मशागत करावी, भाजीपाला, फळफळावळ करावी अशी माझी फार इच्छा आहे. मोटारींतून फिरून कंटाळा आला आतां. "

" हूं ! बेटा भाग्यवान् आहे म्हणायचा ! " दीर्घ श्वास सोडून शेखर म्हणाला. त्याला हलधराचा मत्सर वाटला.

यावर शैला नुसती हसली. पुन्हा तेंच झाड सळसळल्याचा आवाज झाला. काळोख पडूं लागला होता. त्या जगमीच्या झाडावरून एक धडधाकट तरुण खालीं उतरला. त्याच्या पायांत पायघोळ, सैल चोळणा होता. अंगांत खाकी सदऱ्यावर जर्सी होती.

उतरल्यावर त्यानें पायांत वाहाणा घातल्या होत्या. झाडावरून उतरल्याबरोबर त्यानें झाडाखालीं ठेवलेली घोंगडी आपल्या खांद्यावर टाकली. घोंगडीशेजारीं ठेवलेली काठी हातांत घेतली व तो घाईघाईनें चालूं लागला.

शेखर उठला व जेथें मोटार ठेवली होती तिकडे जाऊं लागला. शैला आपल्या पाठीमागोमाग खात्रीनें येणार असें शेखरला वाटल्यामुळें तो झपाझप पावलें टाकीत मोटारीजवळ गेला. मागें वळून पाहातो तों त्याला निराळाच देखावा दिसला. शैला दाणदाण पावलें टाकीत त्या तरुणासमोर गेली व तिनें त्याची वाट रोखली.

" तुम्हांला शरम नाहीं वाटत ? " तिनें त्याला रोखठोक सवाल केला.

" कशाबद्दल ? " त्यानें विचारलें.

" आमचं दोघांचं खासगी भाषण झाडावर बसून चोरून ऐकल्याबद्दल ? "

" तुमच्या भाषणाचा कांहीं भाग माझ्या कानांवर पडला खरा. पण तें ऐकण्याचा माझा इरादा नव्हता. मी तुमच्या घरीं तुमचं भाषण ऐकायला गेलों नव्हतों. तुमचं भाषण सुरू झाल्यानंतर मी झाडावर चढून बसलों नव्हतों. मी माझ्या शेतांतल्या जगमीवर चढून बसलों असतां व जगमें तोडीत असतां, तुम्ही माझ्या शेतांतल्या भाताच्या उडव्यावर येऊन बसलांत आणि गप्पागोष्टी केल्यात. "

इतकें म्हणून त्यानें नदीकांठाकडे धाव ठोकली. कारण एक बैल चरत चरत घळपीवर गेला होता व तो पाऊल निसटून नदींत पडण्याचा धोका होता.

शैला त्याच्याकडे पाहातच राहिली होती. त्याच्या धावत जाण्याचा हेतु उमगल्यावर ती मोटारीकडे वळली. शेखर तर आधींच जाऊन मोटारींत चढला होता व हॉर्न वाजवीत होता. शैला कशी चीत होऊन गेली होती. त्या अनोळखी माणसाला हटकून विचारण्याचा आपण केवढा अविचार केला असें तिला वाटत होतें. तो कोण असावा बरें ?

मोटार चालू झाली. थोड्याच वेळांत मागें वळून शेखरनें म्हटलें,—

" तो कोण ओळखला का, आडून ऐकणारा ? "

" खरंच, कोण तो द्वाड माणूस ? "

" तोच तो ! "

" कोण ? "

" तोच तो........." त्यानें त्याचें नांव सांगितलें, पण मोटारीच्या आवाजांत तिला तें ऐकूं आलें नाहीं.

प्रकरण दुसरें

# मोटारखालीं—

मोटार चालू असतां शैलेच्या मनांत त्या माणसाबद्दलच विचार घोळत होते. किती सडेतोड माणूस! किती सरळ आणि उघड्या मनाचा! तो आडून ऐकायला म्हणून बसला असेल असा त्याच्यावर आपण कां आरोप करावा बरें?

त्याचें नाव शेखरनें सांगितलेलें तिला चांगलेंसें ऐकूं गेलें नव्हतें. तिची 'बेबी ऑस्टिन्' जोरांत जात होती. पण ती बरीच जुनी झाल्यामुळें तिचा आवाज येत असे. तशांत ती स्वतः जपून आणि आस्ते चालवी. पण शेखरला काय? एखाद्या भाडोत्री ड्रायव्हरप्रमाणें त्यानें निष्काळजीपणें मोटार चालविली होती.

वास्तविक वर्षादोनवर्षांपूर्वीच मोटार बदलली असती तर थोडीशी भर घालून तिला नवी मोटार घेतां आली असती. आतां त्या मोटारीला चांगलीशी किंमत येणें शक्य नव्हतें. तिचे वडील तर कर्जबाजारी झाल्यामुळें तिला आतां नवी मोटार घेणेंही शक्य नव्हतें. भय्यासाहेबांचा आजारीपणा दिवसेंदिवस वाढतच चालला होता. त्यांचा स्वभावही फार खर्चिक असल्यामुळें त्यांच्या पेन्शन्‌ची रक्कम खर्चाला पुरत नसे. तशांत शैलेची सावत्र आई भद्राबाई—या तर दुसरेपणाच्या. त्यांच्या हौसेला बंधन कोणीं घालायचें? सगळाच उधळपट्टीचा कारभार. शैलेचा कॉलेजचा खर्च होताच. मिळून काय? शैलेला नवीन मोटार खरेदी करण्याचा योग लवकर येण्याचें चिन्ह दिसत नव्हतें. ही मोटार आणखी तीन चार वर्षे काम देण्यासारखी होती. पण आपण कॉलेजला गेल्यावर पाठीमागें भद्राबाई ड्रायव्हरकडून मोटार कशी हाकवतात हें तिला ठाऊक होतें, म्हणून या खेपेस कॉलेजला जातांना ड्रायव्हरला रजा देऊन मोटार बंदच ठेवायची व भद्राबाईनीं आपलें जाणें येणें भाड्याच्या मोटारींतून करावें अशी सूचना वडिलांकडून सावत्र आईस द्यावयाला लावायची असा शैलेचा बेत होता.

तीरासारखा आपल्या बैलाच्या रक्षणासाठीं नदीकांठाकडे धांव ठोकणारा तो उमदा तरुण गडी कोण? दिवसा उजेडांत, निदान आतां पडला होता इतक्या चंद्रप्रकाशांत तरी त्याला पाहायला मिळालें असतें, तर किती छान झालें असतें, असेंही शैलेला वाटूं लागलें होतें. ती आपल्या मनाची निर्भर्त्सना करूं लागली होती. आपला

एक प्रकारचा अधिक्षेप करणाऱ्या त्या दांडगटाचें पुनःपुनः स्मरण व्हावें हें तिला आवडत नव्हतें. ती तो प्रसंग विस्मृतींत ढकलण्याचा प्रयत्न करूं लागली.

चांदणें अष्टमीचें होतें. पौर्णिमा जवळ येत चालली होती. मोटरही जलद् चालली होती. आतां रस्त्यावर झाडी नव्हती. वरतीं आकाश स्वच्छ दिसत होतें. काळोख्या रात्रीं आकाशांत दिसणारा शोभिवंत आकाशगंगेचा पट्टा आज दिसत नव्हता. चंद्राच्या आंगावर आक्रमण करावयास एक ढग येत होता. त्या ढगाची आकृति अगदीं थेट एकाद्या माशासारखी होती. तो मासा आतां चंद्रावर चाल करणार, इतक्यांत त्याला रुंदटपणा येऊं लागला आणि शेवटीं तर तो थेट कासवासारखा दिसूं लागला! त्या निसर्गदृश्याकडे, त्या गंधर्वनगरीकडे पाहात असतां शैलेची एकाग्रता झाली. टप पाडला असल्यामुळें तिला टेकण्याची छान सोय झाली होती. तिला वाटूं लागलें, मासा काय किंवा कासव काय, दोन्ही पाण्यांतच पोहतात; पाणी आठवतांच नदी आठवली; नदी आठवतांच तिचा कांठ आठवला; कांठ आठवतांच तो बैल; ओहो! बैल लक्षांत येतांच त्याला हांकणारा तो दणकट तरुण, तरुण, पण कोण तो? त्याचें नांव तरी काय? तो काळा असेल की गोरा असेल? त्याचें नांव आत्तांच शेखरनें सांगितलें होतें. पण ऐकूंच आलें नव्हतें.

"शेखर! काय म्हणालांत त्याचें नांव?"

आतांपर्यंत गप्प राहिलेली शैला, आतां इतक्या वेळानें आपणाला त्या नांगऱ्याचें नांव कां विचारते हें शेखरला समजेना.

"हलधर," शेखर वळणावर गाडी वळवण्यासाठीं उजवीकडे चक्रसुकाणूं (Steering wheel) फिरवीत म्हणाला, "तोच तो लोकांचं बोलणं आइून ऐकणारा निर्लज्ज हलधर, हलधर, नांगऱ्या हलधर!"

कांहीं असो, पण हें उत्तर, म्हणजे उत्तराची अनुदार पद्धति शैलेला आवडली नाहीं. ती एकदम उसळली.

"शेखर! परक्याला वारंवार वाईट शब्दांनीं उल्लेखणारे स्वतः तुम्हीच निर्लज्ज आहांत!"

या उत्तरानें शेखरच्या मनाला केवढा तरी धक्का बसला आणि मोटार सखल खळग्यांतून वर चढल्यामुळें त्या दोघांच्याही शरीराला धक्का बसला! शेखरनें रागानें चावलेला ओठ या वेळीं पाठीमागें बसलेल्या शैलेला कसा दिसेल?

कांहीं झालें तरी त्या आडमुठ्या तरुणाला पुनः केव्हां तरी गांठायचें आणि त्याची यथेच्छ हजेरी घ्यायची, अशी एक कल्पना शेलेला आली आणि ती बराच वेळपर्यंत तिच्या मनांत ठाणें धरून बसली.

या आठ दिवसांत उकाडा होऊं लागला होता. या वेळीं आकाश बरेंचसें निरभ्र असलें तरी उत्तरेकडच्या क्षितिजाच्या वरील आकाशांत विजेची चमक मधून मधून चमकून जाई. वळीव पावसाची एकादी सर येऊन जाईल असें शेतकऱ्यांना वाटत होतें, म्हणून ते पहांटेला उठून मळणी आटपूं लागले होते. नाहीं तर बाहेर उघड्यांत उभारलेलीं उडवीं भिजून जाऊन भात पाणें व्हात्रयाची भीति होती त्यांना.

मिरच्यांचे आणि मुळ्या-वांग्यांचे रापे वाढून ते लावणास आल्यामुळें त्यांचे वाफे मजेदार दिसत असत. कित्येकांनीं परडीं लावलीं होतीं. कित्येक परड्यास जरूर लागेल तितकें ठेवून बाकीचें ' अवाण ' बाजारांत नेऊन विकीत असत. या ' माठ ' गांवचें ' अवाण ' आजूबाजूच्या गांवांत फार प्रसिद्धीस आलें होतें. त्याच्यावर गिऱ्हाइकांच्या उड्या पडत. हल्लीं या माठ गांवांत शेतकीच्या बाबतींत बरीच सुधारणा घडून आली होती. हलधराच्या देखरेखीखालीं माठ गांवचे सर्व शेतकरी आपापल्या शेतींत चांगलें लक्ष घालीत असत. खुद्द हलधराच्या मळ्यांतला भाजीपाला व बागेंतलीं फळफळावळ तर अमोलिकच समजली जात असे.

माठ आणि मरुळें ही दोन जोड गांवें होतीं. त्यांची हद्द एकमेकांस लागून होती व त्या दोन्ही गांवांचा इतका एकजीव झाला होता, कीं तों दोन्हीं गांवकऱ्यांस व परक्यांस देखील एक आहेत असेंच वाटे. हलधराची शेतजमीन मरुळ्याच्या हद्दीवर देखील होती. हलधरानें नदीच्या बाजूला कोठें परडें, कोठें नारळी पोफळी, तर कोठें ऊस लावला होता आणि रस्त्याच्या बाजूनें डोंगराला काजू आणि आंब्यांचीं कलमें लावून दिलीं होतीं. डोंगरांत व भरड जमिनींत बांबूच्याही रांगा उभ्या होत्या.

सकाळची सहा वाजून गेल्यानंतरची वेळ होती. हलधर डोंगरांतून खालीं उतरत होता. त्यानें डोकीस कानटोपी घातली असून गळ्याभोंवतीं मफ्लर गुंडाळलेला होता. आंगांत सदऱ्यावर जर्सी होती आणि पायांत कोकणी वाहाणा होत्या. डोंगरावरून त्याला खालीं नदीकांठापर्यंत पसरलेल्या आपल्या शेतीची व बागायतीची पाहाणी करतां येत असे.

काजूच्या झाडांना नुकताच मोहर येऊं लागला होता; कित्येकांना मोहर फुटण्या-पूर्वीच्या कोवळ्या लालरंगाच्या डिऱ्या फुटूं लागल्या होत्या. आंब्यांना मोहर यायला

अद्याप बराच अवकाश होता. क्वचित् एकाद्या फणसाला कोयली फुटून लोंबकळत असलेली दिसे.

झाडांच्या मोहराकडे पाहात चालला असतां हलधरचा पाय जरासा घसरला. रात्रींच पाऊस पडून गेला होता आणि त्यामुळें जमिनीवर चिखल झाला होता. रात्रीच्या पावसामुळें पहांटेस धुकें पडलें होतें. धुक्यांतून खालीं मळेजमिनीकडे पाहावयास मौज वाटे.

बैलांना पठारावर पोचवून तो खालीं उतरत होता. बैलांबरोबर राखणा होताच. पण पहाटेस बाहेर पडण्याची त्याची सवयच होती. आतां घरीं गेल्यावर तो दहीभाकर खाऊन वर अर्धा शेर दूध पीत असे व नंतर कामासाठीं बाहेर पडावयाचा. वाहाणेखालीं दगड सापडल्यामुळें त्याचा पाय घसरला होता. तो पायांखालील जमिनीकडे पाहात असतांना त्याला मोटारचें हॉर्न ऐकूं आलें. तो खालीं डावीकडच्या बाजूस पाहूं लागला. मरळ्याकडून एक मोटार येत होती. थोड्याच वेळांत ती डोंगराच्या ज्या भागावर तो उभा होता त्याच्या पायथ्याशीं आली व झट्कन् पुढें गेली देखील. तो खालीं उतरत होता. पांच सहा दिवसांपूर्वीं संधिप्रकाशाच्या वेळीं पाहिलेली ती मोटार बेबी ऑस्टिन्च होती. त्याला त्या दिवशींची सगळी आठवण झाली. आपल्यावर दोघांचें खासगी भाषण आडून ऐकण्याचा हीन आरोप करणारी ती याच मोटारीची मालकीण. पण त्या दिवशींचा तो गोरटेला तरुण तिच्याबरोबर मोटारींत असलेला आज त्याला दिसला नाहीं. ती तरुणी स्वतःच मोटार चालवीत होती.

त्या दिवशींच्या त्या प्रसंगाची आठवण करीत तो पायथ्याशीं येऊन पोंचला, तोंच त्याला कांहींतरी कोलमडून पडल्याचा आवाज ऐकूं आला. त्या आवाजांत लहानशी किंकाळी मिसळल्याचाही आवाज होता. हलधर झपझप झपझप चालूं लागला. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना भुरटी झाडी असल्यामुळें सुमारें अर्ध्या फर्लांगापलीकडचें कांहींही दिसण्यासारखें नव्हतें. तो आलेला आवाज तर दीड फर्लांगाच्या पलीकडचा असावा असें त्याला वाटलें. तितक्यांत त्याच्या मनांत काय आलें कोणास ठाऊक, हलधरानें धाव ठोकली.

त्याला आलेली शंका खरी होती. शैलेची बेबी ऑस्टिन स्लिप् झाली व निसटून खालीं चरांत जाऊन लवंडली. त्यामुळें शैलेला धक्का बसला. तशांत तिनें मोटारीखालीं उतरण्याचा प्रयत्न चालविला असतां पाय चिखलानें बुळबुळीत झालेल्या जागीं पडून



“ कुठं लागलं बिगलं नाहीं ना ? ”

[ पृष्ठ १३

ती घसरली आणि तिच्या पुणेरी वाहाणेनें तिला दगा दिला. ती कुशीवर आडवी पडली. एक कुपितर गोटा तिच्या कंबरेला लागला. तलम सुताचें तें पातळ चिखलांत राड होऊन गेलें आणि जवळच असलेल्या करवंदीच्या जाळीचे कांटे केसांत गुरफटले. पडतांक्षणींच ती किंचित्काल बेशुद्धच झाली. नंतर तिला भिरभिरल्यासारखें वाटलें, म्हणून क्षणभर ती शुद्धीवर असूनही तशीच पडून राहिली. कारण तिचा देह निस्त्राण झाला होता. पायांत उभें राहाण्याची शक्ति असेल असें तिला वाटेना. उठल्याबरोबर ती मोटारीकडे धावली. पण पातळाचा पदर फारच जड कां लागतो म्हणून जर पाहाते, तर सर्वांग चिखलानें माखलेलें !

त्या स्थितीची तिला फार लाज वाटली. कोणीही माणूस फिरकण्यापूर्वी आतां मागच्यामागें घरीं कसें जातां येईल याचाच ती प्रथम विचार करूं लागली. पण ज्या कुशीवर ती पडली होती त्या कुशींत किंचित्सें दुखूं लागलें.

तिनें मोटारच्या सभोंवार फिरून पाहिलें. चर फार खोल नव्हता; चाकेंही अधिक खोल रुतलीं नव्हतीं. पण तिला एकटीला मोटार मागें घेतां आली नसती, इतकें मात्र खरें. कोणी अनोळखी माणूस भेटला असता, तर त्याला वाटेल तें देऊं करून तिनें या वेळीं मदतीला बोलाविलें असतें.

तिनें आजूबाजूला पाहिलें. धुकें पसरलेलें होतें. त्या धुक्यांतून एक माणूस येत असलेला तिला दिसला. त्याला थोपवून धरावयाचा तिनें निश्चय केला. तो माणूस जवळ आल्याबरोबर त्यानें जेव्हां पाहिलें, कीं मोटारींतल्या व्यक्तीला दुखापत झालेली नाहीं, तेव्हां त्यानें नंतर मोटारीकडे लक्ष दिलें. प्रथम तर तो बराच बुचकळ्यांत पडला. नंतर त्याला खरी स्थिति कळून आली.

डावीकडचें चाक वीत दीड वीत उंचीच्या घळणीवरूनच घसरत गेलेलें होतें व तें त्या मेरेलाच अजूनही लागून होतें. उजवीकडचें चाक खुलें होतें. पण रस्त्यावर जायला डावीकडेच सरकलें पाहिजे होतें. गाडी रिव्हर्स चालवून मागें घ्यायची तर डावीकडची घळण किंचित् खोदून, सपाट करून घेतली पाहिजे होती. कुदळ, खोरें, कांहींतरी हत्यार पाहिजे होतें.

मोटार बाहेर काढण्याबद्दलचा विचार त्यानें आपल्या मनाशीं ठरवला आणि मग त्यानें मोटारवालीकडे पाहिलें. तों ती खालीं मान घालून उभी होती.

" कुठं लागलं बिगलं नाहीं ना ? " हलधरनें मोटारीचें निरीक्षण करीत विचारलें.

कोणींतरी, कसेंतरी, केव्हांतरी बोललें पाहिजेच होतें. सुरुवात कोणीं आणि कशी करायची इतकाच प्रश्न होता. संकटाच्या वेळीं अपरिचयापासून उत्पन्न होणारा परकेपणा पार नाहींसा होत असतो. प्रसंगाला तोंड देऊन वेळ निभावून नेण्याचा शैलेचा तर स्वभावच होता. तो हलधर आहे हें तिनें ओळखतांच तिला प्रथम आनंद वाटला, पण मागाहून मनांत एक प्रकारची अढी उत्पन्न झाली. पण त्या अढीतेढीचा या वेळीं काय उपयोग होता ? या वेळीं तिला कोणाची तरी मदत पाहिजेच होती.

त्या अढीच्या मागोमाग तिला लज्जा उत्पन्न झाली. हा काळासावळा, चांगला उंच व धिप्पाड तरुण, आपणांला झटपट उत्तर देऊन निरुत्तर करणारा जवान, आपणांसमोर उभा असून आपण त्याच्यावर भलता आरोप करून त्याला दुखवून ठेवलें आहे, या गोष्टीचें स्मरण होतांच तिला लाज वाटली.

पण इतक्या अवधींत जवळच्या करंबळाच्या मोठ्याशा दोन पानांचा एक डौलदारसा द्रोण बनवून त्यानें जवळच्याच एका खळग्यांत रात्रीच्या पावसाचें सांठलेलें स्वच्छ पाणी भरून तो द्रोण मोटारींत ठेवला.

" लागलं नाहीं तसं; मोटार कशी बाहेर पडते एवढीच काळजी आहे मला, " शैला लाजत बोलली होती.

" तें बघतों आतां मी, " असें म्हणत असतांच हलधरनें तो पाण्याचा द्रोण व जर्सीच्या खिशांतून काढलेली छोट्या, पातळ टॉवेलची घडी मोटरींतील सीटवर ठेविली व तिला आंत बसून तोंड वगैरे पुसावयास सांगितलें.

त्याच्या सांगण्यांतली खुबी तिनें ओळखली. आपल्या चिखलांत लडबडलेल्या आंगाची दुरवस्था तिच्याही लक्षांत आली होती. तेव्हां आपल्याला बाहेर उभें न राहातां मोटारींत बसून राहाणेंच कसें योग्य आहे, हें तिलाही कळून चुकलें होतें. पण हलधर मोटारीच्या मागें उभा राहून इतका वेळ काय करीत आहे, हें तिला कळत नव्हतें.

झाडाची एक मोठीशी फांदी मोडून, तिच्या मोठ्या टोकाकडे चाकूनें तासून तिचा त्यानें पंहारीसारखा खुंट बनवला होता. त्यानंतर त्यानें आपला पायघोळ चोळणा व जर्सी वगैरै काढून ते कपडे त्यानें मोटारीच्या पुढच्या सीटवर ठेवून दिले. त्याच्या आंगावर फ[illegible]रा आणि मांडचोळणा एवढेच कपडे होते.

कपडे ठेवून जातांना त्याच्याकडे शैलेची दृष्टि गेली. पीळदार दंड आणि मांड्या, भरदार फुगीर छाती, रुबाबदार चेहरा, उन्नत आणि रुंद कपाळपट्टी; जास्त कशाला ?

मूर्तिमंत असा डौलदार उघडा मर्दपणा इतक्या जवळून तिनें आजवर कधींच पाहिला नव्हता. ती आपलें कपाळ, कान व तोंड स्वच्छ करीत होती. हलधर तिकडे लाकडी पहारीनें जमीन उकरीत होता.

थोड्याच वेळांत चाकाच्या भोवतीं हवी होती तितकी सपाट व सखल जमीन झाली. हलधर गाडींत बसला व त्यानें गाडी स्टार्ट करून मागच्या मागें चालविली. पण थोडीशी मागें सरकल्यानंतर ती पुन्हा अडकली. या वेळीं आंत शैला बसलेली असल्यामुळें फार जपून गाडी मागें घेतली पाहिजे याची जाणीव त्याला असल्यामुळें त्यानें मोटारीबरोबर दांडगाई न करितां तो खालीं उतरला; आणि जमीन खरचटूं लागला. शैलेला आंत बसून राहाणें योग्य वाटेना. इच्छा नसतांही ती खालीं उतरली व हलधरला मदत करण्याच्या तयारींत उभी राहिली.

"तुम्ही खालीं उतरूं नका. गाडी चालू करून मागें घ्या; मी सांगेन तसतशी मागें घ्या. ही गाडी मागें घेतांना पाठीमागें राहून सांगायला कुणीतरी पाहिजे. मी इथें उभा राहातों," असें हलधरनें सांगितल्यावर शैला मोटार चालवूं लागली. ल्हान मुलाप्रमाणें रिकामें न बसतां हलधरला जितकी मदत आपल्याला करतां येईल तितकी करावी असें तिला वाटतच होतें. हलधर मागें उभा राहून तिला मोटार कशी फिरवावयाची त्या सूचना देत होता. थोड्याच वेळांत मोटार रस्त्यावर आली, तेव्हां त्या दोघांनाही आनंद झाला.

"आतां तुम्ही आंतल्या बाजूस बसा," हलधर मोटारीच्या मड्गार्ड्वर पाऊल ठेवून म्हणाला.

शैलेच्या मनांत तें ऐकावयाचें नव्हतें, पण आपल्या उपकारकर्त्याच्या शब्दाबाहेर जाणें तिला पतकरलें नाहीं. ती [illegible] उठून आंतल्या बैठकीवर बसली. पण मोटार चालू झाली ती थेट पुढेंच माठ [illegible] !

आतांपर्यंत शैला मोटार घेऊन इतक्या सकाळींच कुठें निघाली होती हा प्रश्नच निघाला नव्हता. पण आतां परत मरुळ्यास घरीं जावें लागणार हें शैलेचें ठरल्यासारखेंच झालें होतें. आणि मोटार तर पुढेंच चालली होती. शैलेला याचा कांहीं अर्थ कळेना.

"अहो! मला मागं जायचंय् घरीं!" ती कशी तरी धीर करून म्हणाली.

"घरींच जायचं आहे ना?" हलधरनें विचारलें आणि वळण मारून त्यानें गाडी जोरांत चालविली.

" आपण आतांच घरीं जाऊन पोचूं ! " तो हसत म्हणाला.

शैलेच्या मनांत हलधरचा भावार्थ उतरावयास सुरुवात झाली.

"मला माझ्या घरीं जायचं होतं," ती म्हणाली.

"हो, पण अशा चिखलानं माखलेल्या स्थितींत कशाला ? माझं घर या इथं अगदीं जवळच आहे. गरिबाच्या झोपडीला पाय लावून जा ना ? माझं घर तुमचंच मानून घ्या. तुम्हांला पाहून माझ्या आईला आनंद वाटेल. तुम्हांलाही तेवढ्यांत साफसूफ करतां येईल. अर्ध्या तासाहून अधिक नाहीं वेळ लागायचा."

हलधरची ही विनंति मनापासूनची, निःस्वार्थीपणाची, अगदीं उघड्या मनाची व संभावितपणाची होती. शैलेला ती अमान्य करतां येईना. पण त्या दिवशीं सायंकाळच्या संध्यासमयीं गाडी चालवणारा तो शेखर आणि आज प्रातःकालच्या संधिकालीं गाडी चालवणारा हा हलधर या दोघांच्यामध्यें तुलना तिच्या मनांत चालू झाली.

घर फार दूर नव्हतें. तिथवर पोचेतोंपर्यंत शैलेनें इतक्या सकाळीं आपण कोठें आणि कशाकरितां चाललों होतों, हें हलधरला सांगून टाकलें होतें.

हलधरनें गाडी आपल्या दारासमोर उभी केली. मोटारवाली कोण हें हलधरची आई दाराआडून पाहात होती. तीच आपली आई असें हलधरनें शैलेला इंग्रजींत सांगून दिलें होतें.

दोघेंही खालीं उतरलीं. ओटीवरून समोर दिसणाऱ्या नयनमनोहर देखाव्याचें निरीक्षण शैला करीत असतां हलधरनें घाईनें घरांत जाऊन आपल्या आईच्या कानांत काय तें सांगितलें. म्हातारीचा चेहरा प्रफुल्लित झाला. ती शैलेला घेऊन घरांत गेली.

शैलेला प्रथम आंग धुऊन वस्त्र बदलायचें होतें. तें झाल्यावर तिला दूध व फराळाचें द्यावयाची तयारी म्हातारीनें ठेवली होती. कांहीं ताजी फळफळावळ घरांत होतीच. शिवाय हलधरनें गड्यास हाक मारून कांहीं सूचना गुपचूपपणें देऊन ठेवल्या होत्या. त्या ऐकून घेऊन तो आपल्या कामास लागला होता.

शैलेनें माजघरांत प्रवेश केला. घरांत माणसें दोनच. हलधर आणि त्याची आई. शिवाय दोन नोकरमाणसें. घरांतील स्वच्छता आणि टापटीप वाखाणण्यासारखी होती. शैला इकडे तिकडे फिरून पाहात असतांच म्हातारीनें एका पेटींतून एक धुतलेल्या परीट

घडीसारखें, पण नवीन कोरें पातळ बाहेर काढलें. तें पातळ व परीटघडीचा टॉवेल शैलेच्या हवालीं करून तिनें शैलेला न्हाणीघरांत नेलें.

तेथें एक बाई गरम झरा तापवीत होती. शैला न्हाणीघरांत येतांच बाईनें पाणी काढून दिलें. तेथें साबण वगैरे सर्व कांहीं होतेंच.

शैला आंग धुऊं लागली असतांच मोटार वाजल्यासारखा तिला भास झाला; पण तिकडे तिनें लक्ष दिलें नाहीं. तिची कूस किंचित् दुखल्यासारखी होऊं लागली होती.

इकडे हलधर मोटार घेऊन कोठेंसा निघून गेला होता.



प्रकरण तिसरें

# प्राध्यापक लंवगे

शैला घरांत आल्यापासून म्हातारीला कमालीचा आनंद झाला होता. उत्साहानें व घाईघाईनें घरांत वावरत असतांनाच तिच्या डोळ्यांना भविष्यकाळचे कांहींतरी मनमोहक असे गोड देखावे दिसत होते कीं काय कोण जाणे. शैला अनोळखीची असूनही अगदीं ओळखीचें कोणीतरी जिव्हाळ्याचें माणूस यावें तसें तिला वाटत होतें.

तिनें स्वतः कोको तयार केला होता. हलधर आपल्या शहरच्या मित्रांस कोको किंवा कॉफी प्यावयास देई हें तिला ठाऊक होतें. तो स्वतः ताजें दूधच पीत असे. शैलाकरितां तिनें दूध देखील तयार ठेवलें होतें. शिवाय तिनें उकळलेलें पाणी तयार करून रवरी पिशवी देखील तयार ठेवली होती. मधूनमधून तिला कशाची तरी आठवण होई आणि मग ती माडीवर जाऊन कांहींतरी साफसुफी करून पुन्हा खालीं येई. घरांतलीं नोकर माणसें देखील अगदीं घाईघाईनें वावरत होतीं. त्यांच्या आपसांत चाललेल्या डोळ्यांच्या खुणांचा अर्थ असाच झाला असता, कीं बाई, हलधरची आई, जी आज अशी बोवाळत आहे, त्यांत तिचा काहींतरी धोरणी हेतु असला पाहिजे.

शैला आंग धूत असतां, घडलेल्या प्रकारावर विचार करीत राहिली होती. आपण ओटीवरून समोरच्या टुमदारशा त्या बगीच्याकडे पाहात असतां, त्यांतील प्रत्येक रोपटें, प्रत्येक ताटवा, प्रत्येक भाग न्याहाळीत असतां, बागेची योजना करणाऱ्याच्या कल्पनेचा, योजकतेचा, आवडीनिवडीचा आपण आज कां बरें थांग घेत आहों ? या प्रश्नाचें उत्तर तिच्या मनाला देतां येईना. मघां चाकाखालची जमीन साफ केल्यावर हलधर खळग्यांत सांठलेल्या पाण्यावर हात धुवावयास गेला. तो परत मोटारीकडे आल्यावर स्टीअरिंगला बसण्याच्या आधीं त्याला आपले हात पुसून कोरडे करावयाचे होते, हें ओळखून अगदीं परिचित माणसाप्रमाणें त्याचा टॉवेल आपण त्याला पुढें हात करून दिला. त्या वेळीं तो ओठांतल्या ओठांत कसा मोहक हसला व त्याच वेळीं पुरुष समाजांत निःशंकपणें व निर्भीडपणें वागून पुरुषांवर वचक बसविणारी मुलगी म्हणून आपण कॉलेजांत प्रसिद्ध असून देखील, कधीं नसलेली संकोचाची छटा त्या वेळीं आपल्या हृदयाच्या कोठल्या कोनांत कशी कोठून अवतरली ? त्या गडबडींत त्याच्या तळहातास आपल्या अंगुलीचा स्पर्श झाला असतां, तो स्पर्श आपणांस स्पृहणीय कां व कसा वाटला ?

आंग धुऊन झाल्यावर तिनें वस्त्र बदललें. ती पुन्हा माजघरांत आली. बाई सैंपाकघरांतच होत्या. त्या घरांतील सर्व टापटीप आकर्षक होती. एकंदर घराची अंतर्रचना व बाह्य रचना सुरेख होती. साधेपणांत सुशोभितपणा कसा साधतां येतो, याचा तो एक नमुनाच होता. पण त्यांत ओकेपणा प्रेक्षकास कां दिसावा, याचें कारण कोणासही सांगतां आलें नसतें.

बाई आपल्यासाठीं फराळाची तयारी जिवापाड करीत आहेत हें शैलानें ओळखलें. तें पाहून तीही झटकन् घरांत आली. तिनें रोजच्या सवयीमुळें वेणीफणीचें साहित्य पाहिलें. पण तत्क्षणींच तिच्या लक्षांत आपली चूक आली. वृद्ध बाई या विधवा होत्या. त्या घरांत कुमारिका किंवा सौभाग्यवती अशी कोणीही स्त्री नव्हती. अर्थात् सौभाग्यलेणीं कोठून मिळणार ? तिनें आपले केस हातांनींच निटावले; पण कुंकूं ?

ती झटपट न्हाणीघरांत गेली. हिंदु स्त्री आपल्या कपाळाचें कुंकू आंग धुतांना हातानें काढून तें भिंतीस किंवा जवळ असेल त्या वस्तूस लावून ठेवते. कपाळाचें कुंकूं ती पाण्यानें धुऊन कधींच टाकणार नाहीं. त्या जन्मजात पद्धतीमुळेंच तिचें कुंकूं तिला त्या न्हाणीघरांत सापडलें. तिनें तें खिडकीच्या गजास लावून ठेविलें होतें. तें घेऊन तिनें पुन्हा कपाळास लावलें. माजघरांत येऊन पाहाते, तर एका खिडकीपाशीं सावंतवाडीच्या कारखान्यांत तयार झालेली सुंदर शिसवी सौभाग्यपेटी तय्यार !

शैलेला किती तरी आश्चर्य वाटलें. तिनें त्या शृंगारसाहित्याचा उपयोग केला. पण त्या कामांत फार वेळ न गमावतां तिनें तेथले दोन पाट सैंपाकघरांतच मांडले.

बाई व एक मोलकरीण मिळून फराळाचें साहित्य घेऊन माडीवर चालल्या होत्या; त्या तिथेंच थबकल्या.

"हे पाट कुणाला ?" बाईनीं विचारलें.

"तुमच्याकरितां एक नि माझ्यासाठीं दुसरा," शैला म्हणाली.

"असं कुठं झालंय् ?" बाईनीं म्हटलें, "शिकलेल्या मुली तुम्ही नि श्रीमंतांच्या. आमच्या गरीबाच्या झोपडींत काळावेळानं पाय लागले. ते काय पाट मांडण्याचं काम करायला ? तुमच्यासारखीं श्रीमंत आणि शिकलेलीं माणसं आमच्याकडे येतात कधीं कधीं. त्यांच्यासाठीं बसायउठायची व्यवस्था माडीवर केलेली असते. तुम्ही तिथंच चला बघूं माझ्या मागून. म्हाताऱ्या माणसांचं बघा सांगितलेलं ऐकावं."

बाईच्या बोलण्यांत, प्रत्येक शब्दांत ममताळूपणा आणि वात्सल्य भरलेलें होतें. हा जिव्हाळा तिला साऱ्या जन्मांत आजच प्रथम ऐकूं येत होता. आपली आई आपल्याला जन्म देऊन कधीं कालवश झाली, याचें तिला स्मरणही नव्हतें. सावत्र आईचा तुसडेपणा मात्र तिला भरपूर अनुभवावयास मिळाला होता. त्यामुळें त्या स्नेहार्द्र शब्दांचा विलक्षण परिणाम तिच्या मनावर झाला.

" म्हाताऱ्या माणसांनीं लहान मुलीला अहो जाहो तरी म्हणावं ? " शैलेनें तितक्याच प्रेमळपणें विचारलें.

बाई हसल्या. शैलेच्या वर्तनांतील प्रेमळ अल्लडपणा त्यांना अतिशय आवडला. त्यांची मुलगी पांच सहा वर्षांपूर्वी त्यांना व या जगाला सोडून गेल्यापासून त्यांना असला प्रेमळ प्रकार अनुभवावयास मिळाला नव्हता. श्रीमंतांची अनोळखी मुलगी इतकी आपुलकी बाळगूं शकते नि इतकी शिकली असूनही ताटपाट मांडावयास कचरत नाहीं, हा देखावा त्यांना आश्चर्यकारकच वाटत होता. त्या अचंब्यांत त्या किंचित्काल जागच्या जागीं थांबल्या. तेवढ्यांत शैलेनें त्यांच्या हातचें तबक काढून घेऊन पाटासमोर खालीं ठेवलेंच आणि मोलकरणीला पण तिनें मागें परतायला खूण केली.

मोलकरणीनें खरें म्हटलें तर आपल्या धनिणीचें ऐकावयाचें. पण शैलेच्या आंगोपांगांत अशी काय जादू होती कोणास ठाऊक, कीं तिनें व्यक्त केलेली इच्छा कोणालाही अनुल्लंघनीय वाटावी. मोलकरीण देखील मागें परतली. बाई आणि शैला शेजारींशेजारीं बसल्या. बाई शैलेकडे कौतुकानें पाहात राहिल्या होत्या.

गप्पा गोष्टी करीत असतांच त्यांचा फराळ झाला. पण शैला फारशी बोलत नव्हती. तिचा न बोलण्याचा स्वभावच होता, कीं कांहीं विशिष्ट कारणामुळें ती चिंतामग्न झाली होती हें बाईंना उमगेना. हलधर डॉक्टरकडे म्हणून मोटार घेऊन शेजारच्या शहरीं गेला होता. पण डॉक्टर कोणाकरितां हें त्यांना समजलें नव्हतें. शिवाय शैलेला अपघात झाला होता हें हलधरच्या गडबडींतल्या बोलण्यावरून व त्या बाबतींत त्यानें दिलेल्या सूचनेवरून बाईंच्या लक्षांत आलें होतें. शैलेला कुशींत किंचित् कसकसल्यासारखें वाटत होतें. पण ती तें बाहेर दिसूं देत नव्हती. मात्र तिला ऊन पाण्याची रबरी पिशवी तयार केलेली दिसली होती.

पाहुण्यांच्या जेवणाकरितां जी व्यवस्था माडीवर करून ठेवलेली होती, तिकडे जाण्याचा बेत बाईंना रद्द करावा लागला होता. पण माडीवरील व्यवस्था पाहाण्याची

उत्सुकता शैलेला देखील थोडीशी होतीच. तीं तिघेंही माडीवर गेल्यावर एका खोलींत झोपण्याची व्यवस्था करून ठेवलेली शैलेला दिसली. मोलकरीण ऊन पाणी भरलेली रबरी पिशवी घेऊन तयारच होती.

बाईनीं प्रेमळ शब्दांत आंथरुणावर आडवें होण्यास शैलेला सांगितलें. शैलेनें नको नको म्हटलें, पण फार आढेवेढे घेतले नाहींत. मोलकरीण तिला शेक देऊं लागली. बाई तेथेंच गोष्टी बोलत बसल्या होत्या. त्या वेळच्या बोलण्यांत बाईना इत्थंभूत हकीगत समजली.

शैलेचे वडील आजारी होतेच. रात्रौ त्यांची प्रकृति विशेष बिघडली. सकाळींच डॉक्टरना बोलावणें आवश्यक होतें. मनुष्य पाठवून किंवा पत्र देऊन पुरी हकीगत डॉक्टरना कळली नसती आणि डॉक्टरही कदाचित् तातडीनें आले नसते, म्हणून अगदीं सकाळींच उठून शैला स्वतःच मोटार घेऊन डॉक्टरना आणायला निघाली होती. पुढें गाडीचा अपघात कसा झाला हें कांहीं सांगायला नकोच.

आपली इतकी काळजी घ्यावयास बाईना हलधरनेंच सांगितलें असलें पाहिजे हें शैलेनें ओळखलें. तिचें हृदय कृतज्ञतेनें भरून आलें.

बाईचें वय सरासरी पंचावन्न वर्षांचें असावें असा अजमास शैलेनें केला होता. आधुनिक जगाच्या घडामोडींतील कांहीं कांहीं गोष्टी जाणणारी व फार मायाळू स्वभावाची बाईसारखी स्त्री क्वचितच आढळेल असेंच शैलेला वाटलें.

पण तितक्यांत मोटारीचा आवाज ऐकूं आला. तेव्हां बाई व मोलकरीण उठून हळूच खालीं गेल्या पण शैलेच्या तें प्रथम लक्षांत आलें नाहीं. कारण ज्या आंथरुणावर ती आडवी झाली होती, तेथें जवळच एक नोटबुक पडलें होतें. त्यांतील पानें पडल्या पडल्या उलटीत असतां त्यांतील मजकूर वाचण्यांत ती तेव्हांच गढून गेली व हलधरबरोबर विशेष बोलण्याची संधि मिळेल तर चांगलें, असें तिला तें नोटबुक वाचल्या क्षणापासून वाटूं लागलें. मोटारींतून माणसें उतरल्याचें ऐकून ती एकदम भानावर आली आणि चटकन् निघून खालीं आली.

डॉक्टरना घेऊन हलधर आला होता. शैलेकडून मिळालेली माहिती हलधरनें डॉक्टरांस दिल्यावरून डॉक्टर तयारीनेंच आले होते व भय्यासाहेबांच्या प्रकृतीची खबर खुद्द शैलेच्या तोंडून ऐकल्यानंतर देखील आपली तयारी चुकलेली नाहीं, अशी डॉक्टरांची खात्री झाली. शैला डॉक्टरना घेऊन घरीं जावयास निघाली. निघण्यापूर्वी डॉक्टरनीं शैलेची कूस तपासून पाहिली.

जातांना शैलेला पुन्हा सवडीप्रमाणें केव्हांतरी येण्याबद्दल बाईंनीं विनंती केली व मानेनेंच शैलेनें अनुमति दिली. तिनें सभोवार पाहिलें. हलधर त्या ठिकाणीं नव्हता. शैलेनें आंगावरील वस्त्र संध्याकाळीं पाठवितें असें सांगितल्यावर गाडी चालू झाली. बाई मोटार दृष्टिआड होईपर्यंत पाहात राहिल्या होत्या.

त्या ज्या लगबगीनें घरांत आल्या त्या धावत धावतच माडीवर गेल्या. हलधरच्या खोलींत जाऊन तेथील हलधरचा फोटो त्या टकमक पाहात राहिल्या, त्या जवळ जवळ शुद्धीवरच नव्हत्या म्हटलें तरी चालेल. मोलकरणीनें मारलेली हाक ऐकून त्या झोपेंतून जागें झाल्याप्रमाणें ' ओ ' देऊन जिना उतरल्या. उतरत असतांच डोळ्यांत आलेलीं आसवें हळूच पदरानें त्या पुसून टाकीत आहेत असें त्या चाणाक्ष मोलकरणीच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

देवचांफ्याच्या डहाळीला जरासा जोरानें हस्तस्पर्श झाला, तरी एखादें पान किंवा कळी देठापासून हालते आणि लगेच दुधासारखा चीक गळूं लागतो. गाईला मानेखालीं खाजवलें तर ती आंवढा गिळते आणि डोळ्यांतून टिपें गाळते. मातेचें हृदय या सर्वांहून फार हळवें असतें. भविष्यकाळाच्या पोटांत दूर अंतरावर असलेल्या काल्पनिक सुखाच्या संवेदनेमुळेंसुद्धा ती सद्गद होते व तिच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहातात. बाईच्या अंतःकरणाची कल्पना लग्नाचें वय झालेल्या व लग्नाविषयीं बेफिकीर असलेल्या मुलाच्या आईलाच होईल, इतरांना नाहीं.

हलधर घरांत कोठें दिसत नव्हता. मोलकरणीला सांगायचें काम सांगून झाल्यावर बाई पुन्हा माडीवर आल्या. आज फार चढउतर वारंवार झाल्यामुळें बाईंना धाप लागल्यासारखी झाली होती. दारांतून मोटार निघतांनासुद्धा हलधर घरांत नव्हता. त्यानें सारे कपडेदेखील उतरून ठेवले नव्हते. बाई माडीवर आल्या व त्यांनीं पूर्वेकडच्या गच्चीवरून पाहिलें तों परड्यांतील विहिरीच्या राहाटावर हलधर बसून पाणी काढीत आहे असें तिला दिसलें. पण मध्येंच तो पायराहाट थांबला. त्या जागेवरून रस्त्यानें जाणारी मोटार दिसत असे. हलधर त्या मोटारीकडेच पाहात राहिला होता !

बेबी ऑस्टिन् मोटार ती. वरती टप पसरलेला होता. त्या चिमुकल्याशा मोटारमधून आंत बसलेलें माणूस दिसणें शक्य नव्हतें. पण असें असून देखील त्या मोटारीकडे हलधरनें कां पाहात राहावें? हलधरसारख्याच माणसाला तें कळेल.

बाईच्या डोळ्यांत एक प्रकारची तेजस्वी छटा या वेळीं दिसली असती. मनांत त्यांनीं

कसली तरी खूणगांठ बांधली. त्या पुन्हा खालीं उतरल्या आणि कामास लागल्या. त्या मोटारीकडे हलधर रहाट थांबवून कां पाहात होता हें बाईना उमगलें असेल काय ?

पूर्वीपासून बाई हलधरकडे कधींकधीं लग्नाची गोष्ट काढीत असत. पण या दिवसा-पासून बाईची ती टकळी हलधरकडे रोजच सुरू झाली. हलधर कांहींच बोलत नसे. पूर्वी तो ती गोष्ट साफ उडवून देई. आपल्याला कांहीं शेतकीचे व फळांचा रस टिकवून ठेवण्याचे प्रयोग करून पाहावयाचे आहेत. ते पूर्ण यशस्वी झाल्यानंतर आपला धंद्याचा जम बसेल व त्यानंतर आपण लग्नाचें पाहूं असें हलधर आईस सांगून तिला गप्प बसवी. पण हल्लीं तो मुळींच कांहीं बोलेनासा झाला.

हलधर व त्याची आई भय्यासाहेबांच्या प्रकृतीची चोकशी आल्यागेल्याकडे करीत असत. एक दिवस स्वतः हलधरच त्यांची तबियत पाहावयास डॉक्टरबरोबर गेला होता. भय्यासाहेबांच्या बिछान्याजवळ भद्राबाई, त्यांच्या पत्नी, होत्या. डॉक्टरच्या बरोबर हलधरला पाहून त्या घरांत निघून गेल्या. पण जातांना त्यांनीं जो चेहरा केला त्यांत हलधरबद्दलच्या अकारण दीर्घद्वेषाची छटा उमटलेली निरीक्षकास दिसून आली असती. हलधरच्या लक्षांत ती आली होती कीं नाहीं नकळे.

डॉक्टर व हलधर निघून जाण्यापूर्वीच तेथें भय्यासाहेबांचा एक सावकार धरणें धरून बसावयास आलेला होता. तो देखावा पाहावयाच्या पूर्वीच डॉक्टर व हलधर निघून गेले. शैला कोठें तेथें हलधरला दिसली नाहीं. जातांना भय्यासाहेबांच्या परिस्थितीच्या बऱ्याच गोष्टी हलधरला कळल्या. ते दोघे तेथें जावयाच्या आधींच नुकते भय्यासाहेबांच्या घरावर जप्ती घेऊन आलेले लोक उठून गेले होते. शैला बाहेर न दिसण्याच्या कारणाचा उगम यांतच कोठेंतरी असावा असें हलधरला वाटलें.

पण हलधरच्या मनांत लागोपाठ दुसरी एक अनिष्ट कल्पनाही आली. शैला घरांत कोठें जशी दिसली नाहीं, तसा शेखरही त्याला दिसला नव्हता. शेखरची आठवण हलधरला कायमची राहिलेली होती. शैला आणि शेखर दोघेंही त्याला दिसलीं नाहींत.

पण भय्यासाहेबांच्या आजारांत भद्राबाईच्या तर्फेचा तो शेखर तेथें कसा बरें नाहीं ? या प्रसंगीं तर तो असावयास पाहिजेच होता. शैला किती दिवस इथें नाहीं, याचा मागमूस हलधरला डॉक्टरांच्या बोलण्यांतून काढतां येईना आणि प्रत्यक्ष तर तसें स्पष्ट विचारण्याचें धैर्य हलधरला होईना. त्याचें घर आलें, तसा तो खालीं उतरला; डॉक्टर पुढें निघून गेले.

पांच सात दिवस गेले. हलधर कामानिमित्त बाहेरगांवीं गेला होता, तो नुकताच घरीं आला होता. बागायतीबाबतच्या कांहीं कामानिमित्त त्याचा मुकादम त्याची वाटच बघत होता. मुख्य कामधाम बोलून झाल्यावर त्यानें हळूच एक अशुभ वार्ता हलधरला सांगितली.

" भय्याछाहेब वारले ! " तो म्हणाला.

" ऑं ऽ " हलधरनें आश्चर्याच्या धक्क्यानें घाबरून विचारलें.

" आज तीन दिवछ ! " त्यानें उत्तर दिलें.

" अस्सं ! " दीघ श्वास टाकून व वेताच्या खुर्चीवर आंग टाकीत हलधरानें म्हटलें,

" बुट्टोजी " अशी त्यास हाक मारून हलधर किंचित्काळ थाबला.

हलधर आपल्या मुकादमास गमतीनें ' बुट्टोजी ' या नांवानें हाक मारी. हा मुकादम अतिशय ठेंगू, बुटका होता. त्याचें वय कसें धरलें तरी चाळीस पंचेचाळीसच्या घरांत गेलेलें असेल. पण उंची सारी साडेतीन पावणेचार फुटांच्याच मानानें होती. आंगानें तशांत दुडती हाडाचा. मग ती आकृति कशी दिसत असेल ती कल्पनेनेंही ताडतां येईल. त्याला लहानपणीं देवी येऊन गेल्यामुळें चेहऱ्यावर खोल वण पडलेले होते. वर्ण तर अगदीं काळाकुट्ट. तरुणपणीं येऊन गेलेल्या मुदतीच्या तापाच्या वेळीं जीभ लुली पडली होती. पण नंतर ती हळूहळू सुटूं लागली. तरीही ' स ' वर्ण उच्चारतांना ' छ ' उमटत असे. ही व्यक्ति एवंगुणविशिष्ट असल्यामुळें गमतीदार दिसे. पण बुट्टोजीला आपण रुबाबदार आहोंत असें वाटे व तो रुबाव वाढविण्याकरितां आपल्या मिशांस पीळ भरून त्यांचे आंकडे वर्तुळाकारांत वळवीत असे. पायांत खाकी शॉर्ट्स, डोकीला भगवट फेटा, आंगात खाकी कोट, हातांत गुळगुळीत पालीसचा सोटा व त्या आंकडेदार मिशा असा तो अवतार पाहिला, कीं कोणालाही हसें आवरत नसे. पण हा बुट्टोजी मुकादम फार विश्वासू आणि कामसू असल्यामुळें हलधरचा प्यार होता. बुट्टोजीच्या तोंडची ती दुःखकारक बातमी ऐकून हलधरचें मन अस्वस्थ झालें.

आपल्याला हाक मारून बाळासाहेब कां बोलत नाहींत, याचें कोडें बुट्टोजीस उलगडेना. तो तोंड वासून हलधरकडे बघत राहिला होता.

हलधरनें एक आंवढा गिळला आणि विचारलें,

" बुट्टोजी ! तुला कुणीं सांगितलं ? "

" त्या दिवशीं डॉक्टर चालले होते परतून, त्यांचं तोंड उतरलेलं दिछलं. मी त्यांना विचारलं. त्यांनीं छांगितलं छारं वर्तमान. "

" डॉक्टर असतील वाटतं घरीं आज ? "

" नाहीं, ते आज रत्नागिरीला अछतील. कालच गेले ते. "

" काय सांगत होते आणखी ? "

" छावकारांनीं घरांत दांतांत घालायला काडीदेखील नाहीं ठेवायला. मोटारदेखील वालावलच्या वणजाऱ्यानें नेली. घरांत दाणे तरी अछतील कीं नाहीं कुणाछ ठाऊक ! भद्राबाईनीं म्हणे पूर्वीपाछूनच निराळी माया करून ठेवली आहे. पंचाईत पडली अछेल त्या बापड्या छैलाक्कांची ! "

बुट्टोजी टक लावून हलधरच्या चेहऱ्याकडे पाहात होता.

" बरं, चला तुम्ही " असें म्हणून हलधरनें बुट्टोजीला रजा दिली. त्याच दिवशीं संध्याकाळीं हलधरची आई भद्राबाईंना वगैरे भेटावयास गेली. हलधर वालावल–चेंदवणकडच्या बाजूला गेला असावा.

भय्यासाहेबांच्या कुटुंबांत आतां दोनच माणसें. भद्राबाई आणि शैलाक्का. भद्राबाई शैलेचा फार द्वेष करीत असे. शेखरनें घरांतच राहावें अशी भद्राबाईची इच्छा होती. पण त्या विचाराला भय्यासाहेबांची अनुमति शेवटपर्यंत मिळाली नव्हती. तो भद्राबाईचा दूरचा म्हणे नातेवाईक होता. पण कांहीं दिवसांपूर्वी घरांत भांडण होऊन तो भद्राबाईच्या हाकेला ' ओ ' देण्याचा निश्चय करूनच गेला होता असें लोक कुजवुजत.

भय्यासाहेबांच्या मृत्यूनंतर शैलेचें कॉलेजशिक्षण सुरू राहाणें अगदीं अशक्य होतें. शेखरचें आणि शैलेचें लग्न होऊन शेखरनें घरांतच राहावें अशी भद्राबाईची इच्छा होती. त्या दृष्टीनें शेखरचे प्रयत्नही सुरू होते. मात्र भय्यासाहेबांची तशी मुळींच इच्छा नव्हती. भद्राबाईच्या या कल्पनेंत लोकांना भद्राबाईचे निरनिराळे कांहीं तरी गूढ हेतु दिसत.

भय्यासाहेबांच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत कॉलेज सुरू झालें. पण कॉलेजच्या प्रोफेसरांना शैला वर्गांत कोठें दिसेना; किंवा तिचा अर्ज, पत्र वगैरे कांहींच आलें नाहीं. वर्गांत आल्यानंतर चोहोंबाजूंस दृष्टिक्षेप टाकल्यानंतर किंचित्काल विद्यार्थिनींच्या ताटव्याकडे नजर स्थिरावण्याची सवय प्रो. लंवगे यांची होती. पहिल्याच दिवशीं पहिल्याच दृष्टिक्षेपांत त्यांच्या दृष्टीला चुकल्याचुकल्यासारखें वाटलें व वर्गांत एकदम टाळ्यांचा गजर झाला.

तो टाळ्यांचा गजर ऐकून प्रो. लंवगे फार चपापले. त्या तासांत त्यांची शिकवण यथातथाच झाली. घंटा व्हायच्या आधींच दहापंधरा मिनिटें ते वर्गातून निघून गेले. त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून विद्यार्थी आपापसांत कुजबुजूं लागले. कित्येकांनीं आज वर्गात प्रवेश करण्यापूर्वीचे प्रो. लंवगे व वर्गातून निघून जातांनाचे प्रो. लंवगे " अशा मथळ्याखालीं त्यांचीं चित्रेंही रेखाटलीं. एका पठ्ठयानें तर छोट्या कॅमेऱ्यानें त्यांचे फोटोग्राफस्‌देखील घेतले होते !

मरुळें गांवच्या लोकांना भय्यासाहेबांच्या मृत्यूचें विस्मरणदेखील पडलें. भय्यासाहेबांच्या निधनाला आतां जवळ जवळ एक महिना होऊन गेला होता. शैला देखील आतां आपलें मन इतर विषयांत गुंतविण्याचा प्रयत्न करूं लागली होती. बाई तिला मधून मधून भेटावयास जात असत. मात्र हलधर तिला भेटावयास पहिल्या अकरा दिवसांत तो एकदा जाऊन आला होता, जो पुनरपि अद्याप गेला नव्हता.



प्रकरण चौथें

# नवा प्रयोग

भय्यासाहेबांची स्थावर मिळकत सर्व गहाण होती. जंगम जिनगी भद्राबाईंनीं दुसरीकडे नेऊन ठेविली होती. घरांत असलेली विशेष ठळक अशी मालमत्ता सावकारांनीं अडकवून टाकली होती. एके दिवशीं भद्राबाई आणि शैला यांचें भांडण जुंपलें असतां बाई तेथें गेल्या होत्या. त्यांनीं आग्रह करून शैलेला आपल्या घरीं आणलें. स्वाभिमानी शैला लोकांच्या घरीं जाणारी नव्हे, पण त्या उद्वेगाच्या भरांत तिनें चटकन् बाईंची विनंती मान्य केली आणि आठ दिवसांकरितां म्हणून ती बाईंच्या बरोबर राहावयास म्हणून आली. त्यामुळें बाईंना कितीतरी बरें वाटलें.

प्रथम कांहीं दिवस शैला एका खोलींत कोंडून घेऊनच बसे. तिचीं कांहीं वाचनाचीं पुस्तकें होतीं. तीं वाचण्यांत ती वेळ घालवी. नंतर हलधरकडे येणारीं नियतकालिकें चाळण्यांत तिचा कांहीं वेळ जाई. बाईंबरोबर घरांत वावरण्यास ती गेली तर बाई तिला तसें करूं देत नसत. संध्याकाळच्या वेळीं ती घराच्याच आवारांतील बगीचांत, कधीं शेतजमिनींत तर कधीं मळ्यांत, तर कधीं डोंगरांतदेखील फिरायला जाई. बाहेर फिरायला गेली तर ती कोठेंतरी एकटीच विचार करीत बसे.

तिच्यावर हलधर दूर अंतरावरून नजर ठेवी, पण तो तिच्याशी फारशी सलगी करीत नसे. केव्हां केव्हां तो बुट्टोजीला तिच्या सोबतीला देई. बुट्टोजी आधींच मूळचा हास्यमूर्ति. तो तिला हसविण्याकरितां म्हणून मुद्दाम कांहींतरी गमती करी. त्यामुळें बुट्टोजीचा आणि तिचा परिचय हळूहळू वाढत चालला.

सृष्टिसौंदर्यांत, भाजीपाल्याच्या मळ्यांत, नदीकांठच्या नारळीबागेंत फिरतांना तिच्या मनाला समाधान वाटे. निसर्गाचें निरीक्षण, बुट्टोजीचें गमतीदार बोलणें, बाईंचें वात्सल्य व हलधरचा सुहृद्भाव या सर्वांचा परिणाम तिच्या प्रकृतीवर अनुकूल होऊं लागला. हलधरच्या शेतीच्या व फळफळावळीच्या प्रयोगांत तिचें मन रमूं लागलें. शेती आणि बागबगीचा हा विषय तिला कॉलेजांतील विषयांच्या घोकंपट्टीपेक्षां जिवंत आणि रम्य वाटूं लागला. सदा सर्वकाळ व्यवसायांत निमग्न असलेल्या साधुतुल्य हलधरचें शुद्ध जीवन तिला आदरणीय वाटूं लागलें.

विहिरीच्या पलीकडल्या बाजूस त्याची प्रयोगशाळा होती. त्यांत अननस, आंबा, कोकम इत्यादिकांचे रस काढून ते टिकाऊ करण्याचे प्रयोग चालत असत. पण हलधरचें मन हल्लीं आणखी एका नवीन व्यावसायिक प्रयोगांत गुंतलेलें असे. सुगंधी द्रव्यें तयार करण्याच्या मार्गांत कोणत्या अडचणी येतात व त्या कशा दूर करतां येतील यावर त्याचें मनन व प्रयोग सारखे चालू असत. कुसरीचें फूल, कुड्याचें फूल, करवंदीचें फूल वगैरे रानटी पण सुगंधयुक्त फुलें कोंकणच्या रानमाळांत विपुल भरलेलीं आहेत व त्यांचा योग्य उपयोग न केल्यामुळें तीं फुलून, सुगंध विखरून व सुकून, आपला उपयोग करून न घेणाऱ्या मतिमंद विद्वानांना नित्यशः शाप देत गळून जात आहेत. त्या फुलांकडे हलधरचें लक्ष वेधलें.

ज्या सालीं भरपूर लाग येतो, त्या सालीं कलमी व रायवळ आंबे जमिनीवर अथवा घरांत पिकून कुजून जातात. काजू आणि जांभूळ या फळांकडे तर कोणी ढुंकूनदेखील बघत नाहीं. फुलें आणि फळें यांच्यापासून अत्तरें, सुवासिक द्रव्यें, मुरंबे, लोणचीं, अर्कें, तैलें, अवलेह, सरबतें, टिकवून ठेवलेले रस, इत्यादि अनेक प्रकारचा माल तयार होण्यासारखा असतां, तिकडे कोणाचीच दृष्टि वळत नाहीं, हें पाहून हलधरला फार वाईट वाटे. रस टिकवून ठेवणें व सुगंधी द्रव्यें तयार करणें या बाबतींत त्याचे कांहीं प्रयोग यशस्वी झाले होते. फक्त ते प्रसिद्ध करून कारखाने चालू करावयाचें अवघड कार्य राहिलें होतें. सरकारचें पाठबळ व सरकारी मदत असल्याशिवाय या कोंकणच्या उद्योगधंद्यांना मूर्त स्वरूप येणार नाहीं अशी त्याची खात्री होती. भांडवलाची मदत व सरकारचा पाठिंबा या दोन संधि कधीं, कशा साधावयास मिळतात याचीच तो वाट पाहात होता.

या प्रयोगशाळेंत केव्हां हलधर नसतांना तर केव्हां तो असतांनाही शैला येऊन फिरत असे. हलधरचे ते प्रयत्न ती कौतुकादरानें पाही व त्यांत तिचे तासचे तास निघून जात. क्वचित् प्रसंगीं ती त्याला हातून होईल ती मदतदेखील करीत असे. पण ती पूर्वीसारखी आतां मनमोकळी कॉलेजकन्या राहिली नव्हती. बापाच्या मृत्यूपासून तिला एक प्रकारचा कसला तरी हृद्रोगच लागून राहिला आहे असें बघणाऱ्यास वाटलें असतें. तिचें दुःख हलकें झालें होतें, पण चिंता वाढत चालली होती. आपण परक्याच्या घरीं येऊन तुकडे मोडीत पडलों आहोंत,—असें तर तिला वाटत नसेल ना ? शैलेच्या चिंताग्रस्त चेहऱ्या-कडून हलधरला असेंच वाटे. शैलेच्या मनाला कोणती चिंता टोचीत राहिली आहे आणि ती आपणांला दूर करतां येईल कीं काय असें हलधरच्या मनांत अनेकदां येई.

आज हलधर आपल्या प्रयोगशाळेंतच होता. काजूच्या बोंडफळांच्या रसांत कोणतें जीवनद्रव्य आहे हें त्यानें शोधून काढलें होतें. त्याचप्रमाणें आंबा, जांभूळ वगैरे कोंकण-प्रांतीय फळांत कोणकोणत्या जीवनद्रव्यांचें आधिक्य आहे हें त्याला अनुक्रमानें ठरवावयाचें होतें. जांभळांतील जीवनद्रव्य तो आज शोधून काढीत होता. तें पाहावयाला येण्याची उत्सुकता शैलेनें दाखविली असूनही ती कां आली नाहीं याचा विचार हलधर आपल्या मनाशीं करीत होता.

शैला आपल्या खोलींत एक वर्तमानपत्र वाचीत असतां तिची नजर "कॉलेजवार्ता" या सदरावर गेली. त्यांतील बाष्कळ वृत्तान्त वाचून तिचें अंतःकरण बरेंच दुखावलें. त्या वृत्तपत्रांतील तो मजकूर जशाचा तसा दिलेलाच अधिक बरा.

शैला ज्या कॉलेजांत शिकत होती, त्या कॉलेजांतील वार्तेमध्यें पुढील मजकूर होता—

"...... इंटरच्या वर्गात दोन मंजिरी होत्या. एक आम्रमंजिरी व दुसरी तुळशी-मंजिरी. टर्म आटोपल्याबरोबर आम्रमंजिरी ऋतुप्रभावानुसार आपल्या तोऱ्यांत मिरवत व भ्रमरांच्या घोळक्यांना गुंगवीत चालत असते. पण दुसरी डौलदार आणि तरतरीत अशी श्यामलवर्ण पण मोहक तुळशीमंजिरी मात्र वर्गांत न आल्यामुळें प्रो. लंवगे बोलतांना चांचरू लागले आहेत व त्या वर्गांतील मि. साखरदांडे नामक विद्यार्थी चालतांना अडखळूं लागले आहेत. या दोघा बिचाऱ्यांची कींवच करावी. बिचाऱ्या तुळशीमंजिरीवर कांहीं आपत्प्रसंग आल्याची कुणकुण आहे. तो प्रसंग सहन करावयास ईश्वर तिला सामर्थ्य देवो व ती पुन्हा पुढल्या टर्ममध्यें तरी आमच्या कॉलेजमध्यें येवो......"

हा मजकूर वाचून शैलेला अत्यंत वाईट वाटलें. आपलें वृत्तपत्र लोकप्रिय करण्याकरितां ज्ञानप्रसाराचे व करमणुकीचे निरनिराळे प्रकार पाश्चात्य वृत्तपत्रकार योजतात. त्यांचें अधम अनुकरण आमचे लोक करीत असतात. आजचा मजकूर इतका भेदक नव्हता. फक्त तो पितृवियोगाचें स्मरण करून देणारा असल्यामुळेंच तो शैलेला दुःखद वाटला. पण इतर वेळीं याहीपेक्षां पाचकळ विनोद व बोंचक शब्द असलेला मजकूर तिच्यासंबंधीं या वृत्तपत्रांत आल्याचें तिनें वाचलें होतें. वृत्तपत्रीय साधनाचा हा दुरुपयोग होत असलेला पाहून महाराष्ट्रांतील पुढारीवर्ग कसा स्वस्थ बसतो याचें शैलेला आश्चर्य वाटे.

हा मजकूर हलधरच्या वाचनांत आला असेल काय? वरील जो उतारा दिला आहे, त्याच्या पूर्वींच्या उताऱ्यांत तुळशीमंजिरीचा वर्ण, चाल, उंची, वागणूक वगैरे

गोष्टी इतक्या तपशीलवार दिलेल्या होत्या, कीं त्या वाचल्यानंतर तें शैलेचेंच वर्णन आहे, हें सांगावयाची जरूरच लागली नसती. तो मजकूर हलधरनें वाचला असला तर तो आपल्याबद्दलची काय कल्पना करून घेईल अशी लज्जा शैलेच्या मनांत उत्पन्न झाली. म्हणून ती हलधरच्या प्रयोगशाळेकडे जावयाची इच्छा असूनही अद्याप गेली नव्हती.

पण आपण प्रयोगशाळेंत यावयाचें कबूल केलें आहे, याचें तिला स्मरण झालें आणि ती जावयास उठली. प्रयोगशाळेकडे ती जाऊं लागली खरी, पण तिचें मन संकोचित झालें होतें. रोजच्या औदासीन्यांत आणखी संकोचितपणाची भर पडली होती. मनुष्यप्राण्यावर काल हा वयाच्या रूपानें जे फेरफार घडवून आणीत असतो, त्या फेरफारांचा अंमल आंतून मनोवृत्ति आणि बाहेरून वेषधारण अथवा पेहराव हीं किंचित्काल तरी चालूं देत नाहींत. रुमाल किंवा पगडी धारण केलेला व गंभीर वृत्तीचा तरुण जितका प्रौढपणाकडे, तितकाच टोपी व अल्लडवृत्ति धारण केलेला प्रौढ तारुण्याकडे झुकत आहेसा दिसतो. पहिल्या प्रथम शैला हलधरला दिसली तेव्हां ती गोल नेसली होती आणि तिनें पाठीवर शेपटा सोडला होता. ती ल्हान मुलीप्रमाणें हातानें गवत कापण्याचे, फुलें कुसकरण्याचे असे चाळे करीत होती. डोकीवर पित्याचें छत्र असल्यामुळें सावलींत वाढलेल्या रोपटाप्रमाणें ती कोवळी आणि अल्पवयी अशी हलधरला त्या वेळीं दिसली.

पण आज ती निराळीच दिसत होती. हल्लीं बाई किंवा मोलकरीण तिचे केस विंचरीत. त्यामुळें बहुतकरून बुचडा किंवा चक्करच तीं घालीत. शैलाही आतां गोल नेसत नसे. चिंता आणि औदासीन्य यांनीं आपापल्या रंगछटा तिच्यावर चढविल्या होत्याच. मातृपितृविहीन अशी ती पोरकी मुलगी सावत्र आईच्या जाचणींत सापडली होती. हलधरच्या प्रयोगशाळेकडे जातांना चिंताग्रस्त मनानेंच ती पावलें टाकीत होती. शिवाय संकोचितपणाचें नवें पुट तिच्या त्या मुखचर्येवर चढलें होतें. दुरून पहाणाराला ती दोन मुलांची आई झालेल्या संकटग्रस्त स्त्रीसारखी दिसली असती.

हलधराचें लक्ष तिच्या येण्याकडे होतें. तिला बसायला त्यानें खुर्ची ठेवली होती. त्या ऋतूंतील निरनिराळ्या फुलांचे गुच्छ त्यानें प्रयोगशाळेंत रोज जमवावे. तेच आज जास्त प्रमाणांत त्यानें जमविले होते. पानें, फळें, साली, मुळें वगैरे वनस्पतींचीं आंगोपांगें त्यानें विभागवार रचून ठेवलेलीं होतीं. खिडकींतून तो तिच्याकडे मधूनमधून बघत होता. तिला पाहून त्याला कसेंसेंच वाटलें. तिनें आपलें संकट कांहीं असेल तर

तें मोकळ्या मनानें बोलून दाखवावें असें त्याला वाटे. तिच्याविषयींची त्याची अनुकंपा वाढत चालली. अमुक एका गोष्टीमुळें आपल्याला काळजी पडली आहे असें जर तिनें स्पष्ट शब्दांत त्याला सांगितलें असतें, तर ती गोष्ट साध्य करण्यांत त्यानें क्षणभरही विलंब लावला नसता आणि जिवाचीही पर्वा केली नसती. पण शैला मनमोकळेपणानें नीटशी कधीं बोलतच नसे.

आतां ती येत असतांना विचारमग्न असतांही एके ठिकाणीं थबकलीच. अद्याप ती आली नाहीं कशी म्हणून हलधरनें पुनः खिडकींतून पाहिलें, तों ती एका वेलापाशीं उभी आहे असें त्याला दिसून आलें. दोन दिवसांपूर्वी प्रयोगशाळेंतून जात असतां ती त्याच ठिकाणीं थबकली होती. तेथें थबकून तिनें काय केलें तें हलधरनें न्याहाळून ठेविलें होतें. आतां तेथें ती कां थबकली असेल याचें त्याला त्यावरून अनुमान करतां आलें.

त्या ठिकाणीं एक वेल उगवला होता. बहुधा तो काकडीचा वेल असावा. कोंकणांत या वेलीला तवशिणीची वेल म्हणतात. त्याला पहिलाच तागुर फुटत आहे असें पाहून तिनें त्या वेलाशेजारीं एक काठी रोवून ठेविली होती. त्या दिवशीं तिनें पाहिलेल्या अंकुरांतून नवीन पानें बाहेर पडून तीं दोन बाजूंस सरकलीं होतीं व तागुर बराच लांब वाढून त्यानें काठीभोवतीं नाजूक वेढा घातला होता. वेलीला तागुर फुटल्यानंतर आधारासाठीं बळकट अशा ढांकाचा आश्रय असावाच लागतो. जमिनींत रिघण्यासाठीं वेलाला जशीं मुळें तसे जमिनीवर आधार घेण्यासाठीं तागुर. वेली जवळपास मिळेल त्याचा आधार तागुरांनीं घेतात. सृष्टीची ही योजना जितकी अतार्क्य तितकीच तर्क-परंपरेला उत्पन्न करणारी आहे.

हलधरच्या मनांत तरी तिच्या त्या कृतीनें एक प्रकारची तर्कपरंपरा निर्माण केली होती. शैलेच्या आणि आपल्या बहुतेक आवडी निवडी सारख्या आहेत. आपल्या प्रयोगशाळेंत मदत मिळेल तर किती छान होईल ? पण तसा प्रश्न तिला विचारणें गैर झालें असतें. तिच्या असहाय स्थितीचा फायदा घेऊन आप्पलपोटेपणानें आपण तिला आपल्या घरीं आणून ठेवलें असा त्याचा अर्थ झाला असता. पण अशा असहाय स्थितींत तिनें कोणाची तरी मदत घेणें आवश्यक होतें. तिला स्वावलंबी बनावयाचें आहे, हेंही त्याला ठाऊक होतें. तिचा बेत कोठें तरी नोकरी बघायचा असावा, असेंही त्यानें अनुमान काढलें होतें. वर्तमानपत्रांतील जाहिराती चाळतांना ती त्याला

अनेकवार दिसली होती. तिच्या पोस्टांत जाणाऱ्या पत्रांवरून ती नोकरीच्या शोधांत असावी असा त्याला संशय आलाच होता. आजूबाजूच्या लोकांचीं बोलणीं जशीं हलधरच्या तशीच शैलेच्याही कानांवर जात असावींत. वर्तमानपत्रांतील जाहिरातींवरून नोकरीसाठीं अर्ज करतांना शैलेनें आपणांस कधींच का विचारूं नये असें हलधरला वाटे. आपलें शिक्षण, आपली राहाणी, आपला पोषाख, आपलें रंगरूप व शैलेचें गतायुष्य यांची तुलना केल्यास शैला आपल्याला वरण्याचा यत्किंचितही संभव नाहीं, ही खूणगांठ हलधरनें आपल्या मनाशीं कधींच बांधून ठेविली होती. शैलेच्या मनांत भरेल असें आपल्यापाशीं कांहींच नाहीं याची त्याला खात्री होती. कोणत्या गुणाच्या जोरावर आपलें प्रीतिवेड शैलेला लागेल ? उलटपक्षीं अगदीं पहिल्याच भेटीला आपण तिला रोखठोक निष्ठुर जबाब देऊन दुखवून ठेविली आहे, हें तो विसरला नव्हता. आतांपर्यंत शैलेला मदत करण्यांत त्या आपल्या पहिल्या चुकीचें परिमार्जन करण्याचाही त्याचा एक हेतु होताच.

त्या वेलीच्या परावलंबित्वाकडे पाहून शैलेला काय वाटलें कोणास ठाऊक, पण ती घरीं जावयास परतली. हलधरनें तें पाहिल्याबरोबर त्याला खिन्नता आली. तो आपल्या मूर्ख मनाबरोबर भांडूं लागला. शैला प्रयोगशाळेंत आली काय किंवा न आली काय ? आपण खिन्न कां म्हणून व्हावयाचें ? पण मागच्या खेपेस शैलेनें हलधरच्या नोटबुकांत जीं टिपणें वाचलीं होतीं तीं इतक्यांत तिला आठवलीं आणि पुनश्च मागें परतून ती प्रयोगशाळेकडे जाऊं लागली. कुंपणाच्या कोपऱ्यांतून खुद्कन् कोणीतरी हसल्याचा ध्वनि तिला ऐकूं आला. तिनें चारी बाजूस तीव्र नजरेनें पाहिलें, पण कोणीच दिसलें नाहीं. शेवटीं ती प्रयोगशाळेकडे जावयास निघालीच. इकडे हलधरच्या मुद्रेवर थोडीशी प्रसन्नता विराजमान झाली.

शैला प्रयोगशाळेंत गेली ती निरनिराळे पुष्पगुच्छ पाहूं लागली. कित्येकांचा तिनें नाकाकडे नेऊन वास घेतला. कोंकणांतील निरनिराळ्या वनस्पतींचें तें एक ल्हानसें प्रदर्शन होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. एकट्या हलधरच्या प्रयत्नांचें तें मूर्त स्वरूप खरोखरच प्रशंसनीय होतें. हलधरच्या हाताखालीं वावरणारीं मजूर माणसें अनेक होतीं. पण त्या सर्वांचा चालक तो एकटाच होता.

" यायला बराच वेळ लावलात तुम्ही ? " हलधरनें एक सुंदरसा पुष्पगुच्छ शैलेच्या हातांत देत म्हटलें.

" माझ्या मनांत यायचं नव्हतं, पण मग आलेंच." ती तो गुच्छ गरगर फिरवीत । त्यांतील फुलांच्या रंगांचें निरीक्षण करीत म्हणाली.

" तुमचा स्वभाव हल्लीं कितीतरी बदलला, नाहीं ? " हलधर स्टोव्ह बंद करीत वेचारूं लागला. त्यानें आपल्या शर्टचे हात कोपराच्या वरपर्यंत नेऊन अडकविले ोते. आपलें काम बंद करून तो हात धुण्याच्या तयारींत होता.

शैला कांहींच बोलली नाहीं.

" म्हणजे अगदीं पहिल्या प्रथम प्रदोषकालीं तुमचं प्रथम दर्शन मला झालं, त्या ाळेचा तुमचा स्वभाव माझ्या लक्षांत आहे. आतां पितृवियोगाचं हें मोठं संकट ुमच्यावर आलं हें खरं. पण तेंच मनाला लावून घेऊन बसलं, तर कसं चालेल ? ृष्टींतील वनस्पतींप्रमाणेंच आपण सृष्टींतील माणसं आहोंत." हलधर म्हणाला.

" वनस्पतींशींच खेळणारे तुमच्यासारखे असंच म्हणायचे," शैला त्याच्याकडे नरळ पाहात म्हणाली, " पण असं पाहा, वनस्पतींच्या सर्वच गोष्टी आम्हा मनुष्यांच्या ालीरीतींना लागू पडण्यासारख्या नाहींत. तसं असतं तर किती चांगलं झालं असतं."

हलधरनें आपल्या केसांवरून हात फिरवला व हातरुमालानें तोंड पुसलें. आपल्या ेहऱ्याकडे शैलाची दृष्टि आहे या जाणिवीचा तो परिणाम असावा.

" एखादं उदाहरण सांगा पाहूं, म्हणजे मग तुमचा सिद्धान्त नीट लक्षांत येईल." ़लधर म्हणाला.

" उदाहरण शोधायला का दूर जायला पाहिजे ? " शैलानें केलेला हा आरंभ ेकूनच हलधर स्तिमित होऊन तिच्याकडे पाहूं लागला. " मी येतांना जिथें उभी ाहिलें होतें, तिथल्या वेलीचीच गोष्ट घ्या ना. वेलीचे अंकुर हे तिच्या देहाचे प्रत्यक्ष ाग आहेत. पण तागुर हे आधार घेण्यापुरतीं साधनं आहेत. त्या तागुरांच्या पर्शाबरोबरच त्या वेलीचा देहदेखील तो आधारभूत रोपटा आपल्याकडे ओढूं पाहात ाहीं. वेलीचा दुसरीकडे जाण्याचा रोख वेलीला बदलावा लागत नाहीं. दुसरीकडे ायला अथवा त्या आधारभूत रोपटावर अथवा ढाकावर राहायला ती मोकळी असते. ण आपणा मानवांत अशी स्थिति आहे का ? कोणी असहाय स्त्रीनें आधारासाठीं सहवास ेला तर तिला आपल्याकडे ओढायला स्वार्थलंपट पुरुष नुसते टपलेले असतात. फार ़शाला ? कॉलेजांतील वातावरणांत मला जो थोडासा अनुभव आला आहे, त्यावरून ी मी जाहीरपणें म्हणेन, कीं मोकळ्या मनानें वागणाऱ्या स्त्रीची मुळीं सोयच नाहीं.

अगदीं अहेतुक पाहाणं, बोलणं, स्पर्श होणं या गोष्टींकडे पुरुष स्वार्थी व कोत्या दृष्टीनें पाहातो आणि भलता प्रसंग आणतो."

शैलाचा आवाज चढत चालला. हलधरला कसेंसेंच वाटलें. तिच्या बोलण्याचा रोख आपल्यावरच आहे कीं काय अशी शंका त्याला येऊन गेली.

" सरांस सर्व पुरुषजातीवर आपण असं विधान करणं योग्य नाहीं व्हायचं." फनेलें आणि टेस्टट्यूब्स् नीट जुळवून ठेवीत हलधर म्हणाला.

" काय हरकत ? कोणाची हरकत आहे असं विधान मीं केलं तर ? असा अपवादभूत पुरुष कोण आहे ? " शैलाच्या तोंडाकडे हलधर तीक्ष्ण नजरेनें पाहात होता. ती तीक्ष्णता सहन न झाल्यामुळें कीं काय, किंचित् मवाळलेल्या आवाजांत, खालीं पाहात शैला पुढें म्हणाली,

" आहे का कोणी असा अपवादभूत पुरुष तुमच्या पाहाण्यांत ? "

" कुणाला पाहायचा आहे ? "

" मला स्वतःला."

" आहे कीं ! "

" कोण ? कुठें ? "

" मी स्वतःच."

शैला बोलायची एकदम थांबली. पण किंचित् वेळानें ती म्हणाली,

" मग आपण असं करूं. मला नोकरी मिळेपर्यंत तुमच्याकडेच राहायचं आहे. बाईंनीं मला अतिशयच आग्रह चालविला आहे. पण आपल्याकडे कायम राहाणं हें जनदृष्टीनें अगदीं वावगं ठरणार आहे. कुमारिकेनें परक्याच्या घरांत महिनेच्या महिने तसंच राहाणं योग्य नाहीं. तेव्हां मला तुमच्याशीं आधाराकरतां विवाह करावा लागणार. पण हा मात्र वैषयिक सुखाकरतां, इंद्रियसुखाच्या लालसेनें केलेला विवाह नव्हे. आपणा दोघांनाही जर परस्परांबद्दल आकर्षण वाटलं, तर परस्परांच्या स्वाभिमानास यत्किंचितही न दुखवितां शरीरसंबंध करायला हरकत नाहीं. ती पुढची गोष्ट, पण ही माझी कल्पना आधीं आपल्याला मान्य आहे का ? "

" कल्पना मान्य असो कीं नसो, तुमच्या अटी मला पूर्णपणें मान्य आहेत. त्या अटींचं उल्लंघन मी कधींच करणार नाहीं, इतकं आश्वासन मी निश्चयपूर्वक देऊं शकतों.

आपण हा देखील एक नवीन प्रयोग करून पाहाण्यास तयार आहोंत." हलधर किंचित हसत म्हणाला.

शैलाचा चेहरा देखील या वेळीं किंचित उल्लसित झाला होता. विवाह, प्रेम, शरीरसंबंध, नीतिअनीति वगैरे अनेक विषयांवर त्यांचें त्या वेळीं बोलणें झालें.

शेवटीं दोघांनीं अशा प्रकारच्या अभिनव विवाहांत बद्ध व्हावयाचा निश्चय करून तीं दोघें प्रयोगशाळेच्या बाहेर पडलीं. त्या वेळीं कुंपणाच्या कोपऱ्यांतून कोणीतरी हसलें, तें त्या दोघांना ऐकूं गेलें नव्हतें.



# लपलेली मनुष्याकृति !

अविवाहित स्त्रीपुरुषांमध्यें जितका मनमोकळेपणा अधिक, तितका तो लोकापवादाचा विषय अधिक होतो.

हलधरच्या प्रयोगशाळेंत हलधर आणि शैला या दोघांचा जो निश्चय झाला, त्यामुळें त्या दिवसापासून त्या दोघांच्या परस्परांशीं वर्तनामधील फरक चटकन् कोणाच्याही लक्षांत येण्याइतका स्पष्ट दिसूं लागला. शैलाच्या मनोवृत्तींतही त्या दिवसापासून एकदम फरक पडला. तिचें औदासीन्य बरेंच कमी झालेलें दिसून येऊं लागलें. प्रयोगशाळेंत व मळ्यांतील कामांत ती स्वेच्छेनें थोडा थोडा भाग घेऊं लागली.

या प्रकाराचा बाईंच्या वृत्तीवर तर फारच अनुकूल परिणाम झाला. शेतावर राबणारीं हलधरचीं नोकर माणसें हसतमुख चेहऱ्यानें आपसांत अधिकच कुजबुज करूं लागलीं. बुधोजीच्या चर्येंत, बोलत असतांना डोळे मिचकावण्याची नवीन खोड जडली असल्याचें हलधरला दिसून येऊं लागलें. मोलकरीण शैलाशीं वागतांना पाव्हण्याशीं वागावें तशी आजपर्यंत वागत होती, ती मालकिणीशीं वागावें तशी वागूं लागली. हलधर आणि शैला यांनीं हें बदललेलें वातावरण ओळखलें, पण त्या दोघांपैकीं एकानेंही कोणास कांहींच म्हटलें नाहीं. जी ती व्यक्ति आपापल्या विचारानुसार वागूं लागली.

अशा रीतीनें सुमारें दीड महिना गेल्यानंतर सर्वांना खरा प्रकार कळून आला. महिन्यापूर्वी एकदा आणि त्यानंतर सुमारें महिन्यानें एकदा अशीं दोनदा हलधर आणि शैला मुंबईला जाऊन आलीं. दुसऱ्या खेपेला आलीं तीं नवरा आणि बायको या नात्यानें आलीं. शेतकऱ्यांच्या त्या लहानशा राज्यांत रयतेला नवी धनीण मिळाली आणि बाईंना सून मिळाली. लग्नसोहळा डोळ्यांदेखत पाहाण्याची त्यांची हौस भागली नाहीं; पण सूनमुख पाहाण्याचें सुख मिळालें, यांत शंका नाहीं.

पहिल्या प्रथम बाईंच्या घरीं राहावयास येतांना शैला आठ दिवसांकरितां म्हणून आली होती. पण ती बरेंच दिवस राहिली. त्यानंतर ती आपल्या घरीं एक दिवस गेली. पण पाहाते तों भद्राबाई घरांत नव्हत्या. घराला कुलूप होतें. घर बंद करून भद्राबाई कोठें गेल्या याचा पत्ता तिला मुळींच लागेना. तेव्हां ती पुन्हा बाईंच्याच घरीं

येऊन राहिली. बाईशिवाय तिला कोठेंच थारा मिळण्यासारखा नव्हता. तिला जवळचें आप्त माणूस कोणीच नव्हतें आणि तसें असलें तरी जिच्यापासून कोणताच फायदा नाहीं अशा शैलाला आपलेपणानें जवळ करण्याइतक्या उदार अथवा प्रेमळ मनाचें तरी निदान कोणी नव्हतें. आपल्या पडत्या काळांत सोयीसाठीं आपली दाद न घेणाऱ्या दूरच्या एखाद्या नातलगाचा सुगावा काढून त्याच्या घरीं आपलें चंबूगबाळें टाकण्याइतकी आगांतुकी करण्याचा कोडगा स्वभाव शैलाचा नव्हता. त्यामुळें शैलाला बाईच्या निर्हेतुक प्रेमळपणाचा आश्रय घ्यावासा वाटला. तिनें तेथील एकंदर परिस्थिति पाहिली. हलधर व त्याची आई या दोघांचा मनमोकळेपणा तिला भारीच आवडला. शेवटीं तिनें हलधरशीं रजिस्टर पद्धतीनें विवाह केला.

तीं दोघें विवाहबद्ध होऊन आलीं, त्याच दिवशीं शैला अकस्मात् आपल्या घरी न कळवितां गेली. घरांत भद्राबाई होती. या खेपेस भद्राबाईनें शैलाला पराकाष्ठेचा प्रेमळपणा दाखविला. तिनें शैलाला जवळ घेऊन कुरवाळलें काय, गोंजारलें काय, रडली किती, जिवाभावाच्या गोष्टी बोलली किती, कांहीं कल्पनाच येणार नाहीं. तिचा हा प्रेमळपणा आजवर कोठें लपला होता, हेंच शैलाला समजेना.

पतिनिधनाच्या शोकानें दग्ध झाल्यामुळें मनाला शांत करण्याकरितां व पतीच्या पारलौकिक कल्याणासाठीं म्हणून आपण निरनिराळ्या क्षेत्रांस जाऊन हिंदुधर्मानुसार पतीचें पारलौकिक ऋण फेडलें असें तिनें रडत रडत शैलाला सांगितलें. भद्राबाईनें शैलाला ज्या कांहीं गोष्टी सांगितल्या त्यांत शेखरचें नांव प्रामुख्यानें येई. शेखर हा मोठ्या हुद्द्यावर असून त्याला पगारही चांगला आहे, तो स्वभावाचा बरा असून सर्व सद्गुणांचें केवळ माहेरघर आहे अशा अर्थाचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष उल्लेख तिच्या बोलण्यांत अनेकदा आले. शैलानें ते सर्व ऐकून घेतले.

त्या दिवशीं फारच आग्रह करून भद्राबाईनें शैलाला जेवायला ठेवून घेतलें. मनांत नसूनही शैला राहिली एवढें बरीक खरें. ती स्वतः फारसें बोलत नव्हती. भद्राबाईचें बोलणें ती ऐकून घेत होती. मधूनमधून होय अथवा नाहीं म्हणण्यापलीकडे ती फारसा भाग संभाषणांत घेत नव्हती. जन्म देणाऱ्या आईनें जसें वागवावें, अथवा हल्लींच हलधरच्या आईकडून जसा प्रेमळपणाचा अनुभव तिला आला होता, तशी भद्राबाईची वागणूक तिला आज वाटली.

भद्राबाईच्या स्वभावांत असा फरक कां व्हावा हें तिला कांहीं केल्या उमगेना. हें

खात्रीनें वरपांगीपणाचें ढोंग आहे असेंच तिला वाटलें. जेवण चाललें असतां भद्राबाई बोलत राहिलीच होती. त्यांत तिनें आपलें स्वतःचें घर असतां लोकांच्या घरीं राहाणें किती गैर आहे हें शैलाच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न हेतुपुरःसर चालविलेला होता.

जेवण झाल्यावर बोलतां बोलतां मध्येंच भद्राबाईनें सहज म्हणून शैला सिग्रेट ओढते कीं काय असें देखील विचारून पाहिलें. तो प्रश्न ऐकतांना शैलाला चमत्कारिक वाटलें. कॉलेजांत शिकणाऱ्या कांहीं मुली सिग्रेट ओढण्यांत कांहीं विशेष मानीत नाहींत, असें आपण ऐकल्याचें भद्राबाईनें खुलासा करण्यासाठीं सांगितलें. तरी देखील शैलाच्या मनाचें समाधान झालें नाहीं. आपण सिग्रेट ओढीत नाहींच, पण आपल्या कॉलेजांतील कोणी मुली देखील धूम्रपान करीत असल्याचें आपण कधीं पाहिलें ऐकिलें नाहीं असें शैलानें रागांतच सांगितलें.

पतिनिधनानंतर भद्राबाईनें जें तीर्थाटन केलें त्याचा कांहींतरी परिणाम होऊन भद्राबाईच्या स्वभावांत असा विलक्षण फरक पडला असावा काय, अशी एक कल्पना शैलाला सुचली. पण ती फार वेळ टिकली नाहीं. कारण असें उदाहरण आजपर्यंत तिच्या ऐकिवांत आलें नव्हतें. तसेंच बघूं गेलें तर भद्राबाईच्या बाह्य वेषांत देखील थोडासा फरक पडला होता आणि तो फरक कांहींसा संन्यस्तपणाचाच होता.

संन्यस्तपणा म्हणजे असा, कीं नेसायचें रंगविहीन पांढरें शुभ्र पातळ कसें तरी नसलेलें. पूर्वीं रंगीबेरंगी पातळ भद्राबाई नेसली तर शरीराच्या उन्नत अवयवांवरील वस्त्राच्या भागावर एक लहानशी देखील सुरकुती दिसायची नाहीं. पण आजच्या प्रकारांत नवीन पाहाणाऱ्याला ही बाई जन्माचीच बेंगरूळ आहे असें वाटलें असतें. केशरचनेकडे अत्यंत दुर्लक्ष झालेलें दिसत होतें. कुंकुमतिलकाशिवाय पांढरें फटफटीत कपाळ आणि मंगळसूत्राशिवाय ओका उघडा गळा ! हातांत दोन दोन सोन्याचे बिलवर आणि आंगांत एक पांढरीशी दोरव्याची चोळी. पूर्वींहून किंचित् कृशताही आली होती भद्राबाईच्या शरीराला. सदा तांबूलरसानें रंगलेले त्यांचे ओठ फक्त जन्मजात तांबूसपणा तेवढाच दर्शवीत होते. भद्राबाईचा तो वेष पाहून शैलाला तिची कीव आली. तिला आपल्या प्रेमळ पित्याची आठवण झाली. ती सद्गदित झाली. त्या क्षणीं तरी तिची पूर्ण खात्री झाली, कीं आपली सावत्र आई पतिनिधनानें खरोखरीच विरक्त बनली आहे.

अशा प्रकारचे विचार शलैच्या मनांत डोकावत आहेत तोंच भद्राबाईनें पानसुपारीच्या डब्याकडे बोट दाखवून म्हटलें,

" सुपारी घे ना, घाल तोंडांत थोडीशी."

" हो ! " असें म्हणून शैलानें डबा उघडला. आंत दोनतीन विडे केलेले होते. त्यांतील एक उचलून तिनें तोंडांत घालून चघळण्यास सुरुवात केली.

मुंबईहून आल्यानंतर झटपट स्नान, जेवण उरकून बाईंना सांगून दुपारीं तीनच्या सुमाराला पायीं पायींच गेलेली शैला रात्रौ आठ वाजून गेले तरी कशी आली नाहीं, याची काळजी बाईंना पडली. त्यांनीं हलधरला अनेकदा तिची विचारपूस करण्याविषयीं सुचविलें. तरी हलधर मुळींच जागचा हालला नव्हता. इतकेंच नव्हे, तर अत्यंत उल्हसित वृत्तींत आपल्या नवपरिणीत वधूसह आलेला हलधर दुपारच्या चार वाजल्यानंतर ओटीवरच येरझारा घालीत सुमारें अर्धापाऊण तास राहिला होता.

हलधरचा विचार संपेना. घरांत वावरत असतां बाई आपल्या मुलाची चर्या पारखीत होत्या. त्यांना मनांतल्या मनांत आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. आवडती बायको दूर झाल्यामुळें आपला मुलगा अस्वस्थ झाला आहे अशी त्यांची समजूत होती. आपली आवडती सून दूर गेली म्हणून जर आपल्याला इतकें वाटतें, तर नवऱ्याला बायकोबद्दल किती वाटावें ? अनुभवी म्हातारीचें हृदय तें ! साधीभोळी वत्सल माता अशा विचारांनीं आनंदित होणें साहाजिकच होतें. त्यांना वाटलें, कीं हलधरच्या मनांतून शैलाला आणायला जायचें आहे, पण आपण वडीलधाऱ्या घरांत असल्यामुळें त्याला सासुरवाडीला जाऊन यायला संकोच वाटतो आहे. तो मनांतून आपल्या परवानगीची वाट पाहात असेल, अशा विचारानें त्यांनीं न मागितलेली परवानगी द्यायचा सपाटा चालविला होता.

शेवटीं हलधर शुद्धीवर आला. पण तो केव्हां ?

" जातोस ना शैलाला आणायला ? " असें बाईंनीं त्याच्या पुढ्यांत येऊन म्हटलें तेव्हांच.

" जातों ग ! " कांहींसें त्रासिकपणें म्हणत हलधर निघाला.

दिवेलागणी होऊन बराच वेळ झाला होता. आपली मोठी इलेक्ट्रिक टॉर्च घेऊन हलधर भय्यासाहेबांच्या घरीं जायला निघाला. त्यानें आपला तो ठरावीक शेतकरी पेशाचा पोषाख केलेला होता. तो पोषाख शैलाला भारी आवडत असल्याचें हलधरला समजून आलें होतें. पोषाखावरून शैलाच्या आवडीच्या इतर अनेक गोष्टी हलधरला एकामागून एक आठवूं लागल्या.

हलधर आपली सायकलच घेऊनच जाणार होता. पण तो पायींच जायला निघाला. कंपाउंडाच्या बाहेर गेल्यावर तो पुन्हा मागें परतला आणि सायकल घेऊनच निघाला. दोन मैल जायला आणि पुन्हा तितकेंच अंतर यायला फार रात्र होईल, म्हणून त्यानें सायकलच पसंत केली. कारण सायकलवरून दोघांना आस्ते आस्ते यायला हरकत नाहीं.

एका चांदण्या रात्रीं अशीच हलधर व शैला यांनीं एकाच सायकलवरून दोन तीन मैलांची फेरी घातली होती. स्वतः शैला सायकल चालविण्यांत पटाईत होती. हलधरनें सायकल चालवून शैलाला पाठीशीं घातली होती. बोलतां बोलतां स्त्रीपुरुषांच्या कर्तबगारीचा प्रश्न निघाला, तेव्हां शैलानें स्वतः नेटानें सायकल चालवून हलधरला पाठीशीं घातलें होतें. लग्नविधीसाठीं मुंबईला जाण्यापूर्वीच्या आठवड्यांतील ती गोष्ट होय.

त्याच रात्रीं एका खडकावर बसून त्यांच्या गप्पा चालल्या असतां विवाहित स्त्री-पुरुषांना कितपत स्वातंत्र्य असावें, परस्परांच्या वैयक्तिक व्यवहारांत दुसऱ्यानें ढवळा-ढवळ न करणें कसें इष्ट आहे, विनाकारण बारीकसारीक गोष्टींवरून गैरसमज करून घेऊन बसणें उभयपक्षीं कसें अनिष्ट आहे, परस्परांच्या विषयींचे लोकांचे भलतेसलते अपवाद कसे खोटे असतात व त्यांच्यावर विश्वास ठेवून वागल्यानें वैवाहिक जीवनाचें कसें मातेरें होतें, इत्यादि बाबतींतील त्या दोघांचे विचार इतके तंतोतंत जुळले होते, कीं त्या वेळीं त्यांना त्याबद्दल अवर्णनीय आनंद झालाच, पण त्या प्रसंगाच्या स्मरणानें देखील हलधरला आतां सायकलवरून जातांना आनंद झाला आणि त्या आनंदाच्या भरांत तो दुपारचें किल्मिष पार विसरून गेला.

दुपारीं शैला आपल्या माहेरीं गेल्यावर जी डाक आली, त्यांत शैलाच्या नांवचें एक पत्र व एक मनीऑर्डर आली होती. मनीऑर्डरीचा फार्म घेऊन त्यावरील पाठविणाऱ्याचा पत्ता व नांव हलधरनें पाहिलें, तों तें शेखरचें होतें. ज्या हातानें मनीऑर्डर लिहिली होती, त्याच हातानें शैलाला आलेल्या पत्रावरील पत्ता लिहिला होता. अर्थात शैलाला आलेलें पत्र शेखरचें होतें. शैला घरीं नसल्यामुळें तिचें पत्र हलधरनें ठेवून घेतलें, पण मनीऑर्डर पोस्टमनला दुसऱ्या दिवशीं आणावयास हलधरनें सांगितलें. पोस्टमन बिचारा निघून गेला. पण हलधरच्या मनांत विचारांचें थैमान माजून राहिलें आणि साध्या भोळ्या बाईच्या मनांत हलधरच्या विचारमग्नतेमुळें आनंदाच्या गुदगुल्या होऊं लागल्या.

तें विचारांचें थैमान जुन्या आठवणी झाल्यामुळें बाजूस ओसरलें. आपल्या बायकोला कोणीतरी मनीऑर्डर पाठविली अथवा पत्र पाठविलें तर त्यांत काय बिघडलें ? किती मी कोत्या मनाचा ? किती सनातनी वृत्तीचा ? इतका संशयीपणा मनांत कां लपलेला असावा ? स्त्रीजातीला पुरुषांप्रमाणें इष्टमित्र, आप्त, सोयरे, धागेदोरे कांहीं असूंच नयेत काय ? कोणाचें देणें घेणें, उसनवारी, अडीअडचणीचे प्रसंग हे पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाही कां असूं नयेत ? दुपारपासून झालेली आपली संशयी वृत्ती जर शैलाच्या दृष्टोत्पत्तीस आली असती, तर तिचें मन विनाकारण आपण दुखवल्यासारखें झालें नसतें का ? आणि आपल्या ह्या अनुदार वृत्तीबद्दल तरी तिला काय वाटलें असतें ? अशा विचारांनीं हलधरला स्वतःच्या अधोगामी वृत्तीबद्दल फार लाज वाटली. बरें झालें, कीं दुपारपासूनची ती आपली संशयखोरपणाची मनस्थिति पाहायला शैला घरीं नव्हती असेंही त्याला वाटलें. इतकेंच नव्हे तर यापुढ तिला असलीं कितीही पत्रें आलीं, अथवा प्रत्यक्ष कोणी व्यक्तिही येऊन भेटल्या, तरी आपण तिला वचन दिल्याप्रमाणें आपल्या मनोवृत्तींत यत्किंचित् देखील फरक पडूं देणार नाहीं, अशीही त्यानें मनांतल्या मनांत प्रतिज्ञा केली. एवढ्या तेवढ्या गोष्टीवरून आपण साशंक होणें म्हणजे आपल्या पवित्र पत्नीबद्दल अविश्वास प्रदर्शित करणें होय. कोणती स्वाभिमानी स्त्री असला अपमान सहन करील ? आणि शैला तर एकदम ताडफाड करून एक घाव दोन तुकडे उडविणारी तरुणी. तिनें आपला तत्काळ धिक्कार केला असता. हा विचार येतांच हलधर फारच खजील झाला. सायकलच्या गतीपेक्षां त्याच्या अंतःकरणांतील विचारचक्राचे फेरे जोरानें सुरू होते. त्या विचारांच्या आंत गुरफटलेल्या स्थितींत भय्यासाहेबांच्या बंगल्याजवळ आपण केव्हां येऊन पोचलों हें हलधरला समजलेंच नाहीं. गेटकडे आल्याबरोबर तो सायकलवरून उतरला. त्यानें पायांत घातलेले कॅनव्हासचे बूट तसेच बदलल्याशिवाय राहिले होते. त्यामुळें त्याच्या पावलांचा आवाज देखील होत नव्हता. तो उतरला. सायकल त्यानें गेटजवळच ठेवली आणि तो पोर्चमधून व्हरांड्यांत येऊन एका खुर्चीवर थोडा वेळ बसला.

आतां आपण प्रथम कोणास हाक मारावी, कीं एकदम शैलालाच हाक मारून बोलवावें हें ठरविण्यासाठीं म्हणून तो जरासा बसला, तों आंत कोणीतरी बोलत असल्याचा आवाज त्याच्या कानीं आला.

त्या बोलण्यांतील एकेक शब्द ऐकून त्याचें प्रथम तिकडे लक्ष वेधलें. नंतर तें बोलणें

स्पष्टपणें ऐकावेंसें त्याला वाटूं लागलें. सरते शेवटीं त्यानें नुकतीच केलेली प्रतिज्ञा वितळावयास लागली आणि त्याचें मन भांबावून गिरक्या घेऊं लागलें.

भद्राबाईनें उघडून दिलेल्या डब्यांतील विडा चघळीत शैला एका छानदार कोचावर गुळगुळीत रेशमी उशीला टेकून बसली होती. समोरील दिव्याच्या प्रकाशांत तिचें मुखमंडळ कितीतरी सुंदर दिसत होतें. आंगोपांगांचा प्रमाणशीर रेखीवपणा आणि तारुण्य यांच्यापुढें काळसावळेपणा दोषास्पद न ठरतां सौंदर्यवर्धक ठरतो कीं काय, असा प्रश्न या वेळीं शैलाकडे पाहाणाऱ्या प्रेक्षकाला खात्रीनें पडला असता व त्याचें उत्तर त्यानें अगदीं अस्तिपक्षींच दिलें असतें. केवळ गौरवर्णावर सुंदरता अवलंबून नाहीं हेंच त्याचें कारण असावें.

त्याला जें कांहीं ऐकूं येत होतें, त्याला संभाषण असें यथार्थपणें म्हणतां आलें नसतें. एकाच व्यक्तीचें बोलणें चालू असून दुसरी व्यक्ति त्याला मधूनमधून होकार अथवा नकार मधूनमधून देत राहिली होती. फारच झालें तर ती दुसरी व्यक्ति एखादा दुसरा शब्द उच्चारी.

घोड्याला अथवा कुत्र्याला शिकवावें तसाच कांहींसा तो प्रकार होता असें बाहेर काळोखांत बसलेल्या हलधरला वाटलें. दरवाजे सगळेच नुसते ओढून घेतलेले अगर अर्धवट उघडे टाकलेले होते. त्या अर्थीं आंत चाललेला प्रकार गुप्त नसावा हें उघड होतें. असें असून देखील आपण एकदम आंत रिघणें हलधरला प्रशस्त वाटलें नाहीं. परंतु आपण हलकेच प्रवेश केला तर तें मोठेंसें पाप होणार नाहीं असें त्याच्या बुद्धीनें ठरविलें. त्यानें मुख्य दरवाजाला अंगुलिस्पर्श केला. तो दरवाजा थोडासा उघडला गेला आणि त्यामुळें दिवाणखान्यांतील दृश्य त्याला अंशतः दिसणें शक्य झालें. बाहेरचा दरवाजा उघडाच टाकला गेला होता. हलधरनें मागें वळून तो कडी न घालतां लावून घेतला.

भद्राबाई कोचाजवळच्याच खुर्चीवर बसली होती. ती बोलत असतां शैलाकडे मधूनच न्याहाळून पाहात असे. एखादा जादूगार प्रेक्षकांस खेळ दाखवीत असतां आपण शब्दांनीं करीत असलेल्या वर्णनाप्रमाणें चमत्कार खरोखरच घडत आहे कीं नाहीं हें जसें निरखून पाहात असतो, तशाच नजरनें भद्राबाई शैलाकडे पाहात होती.

“ शेखरला कोल्हापूर दरबारांत मोठी असामी मिळाली आहे. तो आहेच तसा गुणी.” भद्राबाई म्हणाल्या.

" हूं." शैला समोरच्या भिंतींवरील घड्याळाच्या हालणाऱ्या लंबकाकडे पाहात होती. भद्राबाईंनीं लवंगेची एक काडी घेऊन तोंडांत टाकली.

" त्याचं तुझ्यावर प्रेम आहे. " भद्राबाईंनीं म्हटलें.

" हूं. "

" पण तुझं प्रेम कुणावर आहे कुणास ठाऊक..." भद्राबाई शैलाच्या चेहऱ्याकडे निरखून पाहूं लागल्या.

बाहेर खुर्चीवर ऐकत बसलेला हलधर देखील जागेवरून उठून दाराच्या फटींतून शैलाकडे पाहूं लागला. व्हरांड्यावरील कोनाड्यांत खटकन् कांहींतरी वाजलें.

हलधर दचकून एक पाऊल मागें सरकला. त्यानें इकडे तिकडे पाहिलें. त्यानें पुन्हा आंत डोकावलें. शैलाचा चेहरा निर्विकार होता.

" त्या नांगऱ्या हलधरवर तुझं प्रेम आहे वाटतं ? "

" हूं ! "

" पण लग्नाबिग्नाचं अजून ठरलं नाहीं ना ? "

" उं हूं ! "

" तेवढं तरी चांगलं. तूं तिकडे लोकांच्या घरीं जाऊंच नकोस मुळीं. इथेंच माझ्याबरोबर राहा. लोकं हसतात ना आपल्याला. आपलं कुल किती निर्मळ ? "

" हूं. "

" शिकलेल्या मुली अशा अविचारानें वागतात, म्हणूनच त्यांच्याबद्दल लोकांत बोभाटा होतो. त्या असतील ग तुझ्यासारख्या निष्पाप. पण तें लोकांना कसं कळावं बरं ? "

" अं ? "

" अग लोकं बाहेर दिसणाऱ्या प्रकारावरूनच अनुमान काढीत असतात ना ? म्हणून तर आपण बाह्यात्कारी देखील नीट वागलं पाहिजे, नाहीं का ? "

" हूं ! "

" आज तूं बोलत कां नाहींस, नुसता हुंकारच देत राहिलीयेस् ? " असें विचारून भद्राबाई हसल्या. त्या त्यांच्या हास्यांत अत्यंत समाधानाची छटा होती.

शैलाच्या मुखावर देखील हास्याची छटा उमटली.

" तुला कांहीं पैशांची जरूर लागली तर शेखर पाठवीत राहील. माझ्याकडे रोकड पैसा असता, तर मींच दिला असता, पण सावकारांनीं काय ठेवलंय आपल्याला ? खरंच, स्त्रियांना वारसाहक्क मिळणं किती जरूर आहे, हें आमच्यासारख्या स्त्रियांचीं दुःखं पाहिल्याशिवाय कायदेमंडळांतील पुरुष सभासदांना कळणारच नाहीं. ते बापडे बडोद्याचे राजरत्न जोशी वकील तेवढे स्त्रियांच्या वतीनें झटत असतात. "

" हो. त्यांनीं स्त्रियांचीं दुःखं वेशीवर टांगण्याकरतां कादंबऱ्या देखील लिहिल्या आहेत." शैला प्रथमच एक लांबलचकसें वाक्य बोलली.

" होय ग, पण विचार कोण करतो ?"

" हं. "

" शेतकऱ्यांचं कर्जनिवारण केलं पाहिजे, कामकऱ्यांवर कर्जाचा बोजा होऊं नये म्हणून सावकारीवर बंधनं घातलीं पाहिजेत, हें आमच्या हल्लींच्या कॉंग्रेस मंत्र्यांना कळतं म्हणे. पण तुझ्या वडलांच्यासारख्या साध्याभोळ्या, सालस स्वभावाच्या, गरजू जमीनदाराला,—लेखांनीं नाडणाऱ्या पाताळयंत्री सावकारांच्या मुसक्या बांधायला नकोत का ? त्यांना हें कां कळूं नये बरं ?"

" खरंच." शैलाची नजर घड्याळाच्या कांट्यावर खिळून राहिलेली होती.

जिभेला किंचित भिरभिरल्यासारखें झाल्यामुळेंच की काय, ती कोचावरून उठली. घरांत झटकन् जाऊन तिनें पाण्यानें भरलेला एक चांदीचा पेला आणला. पाण्याची एक चूळ भरून ती बाहेर टाकण्याकरितां ती चटकन् उठून दाराकडे गेली. बाहेरचें दार उघडून तिनें चूळ टाकली आणि तेथेंच काळोखांत उभी राहून ती थंडगार पाणी दोन घोट प्यायली आणि लगेच आंत येऊन आपल्या जागेवर बसली. रात्र फार झाल्याची कल्पना तिला आली आणि ती घाबरल्यासारखी झाली.

पण इकडे हलधरची कितीतरी त्रेधा उडाली. तो लगबगीनें डावीकडे सरकला. एका खुर्चीला त्याचा स्पर्श झाला. ती खुर्ची टाळण्याकरितां तो आणखी जरा डावीकडे सरकला. तों माणसाच्या आंगासारखें त्याच्या डाव्या हाताच्या तळहाताला कांहींसें लागलें. म्हणून काळोखांतच त्यानें आपला हात लांबवून सभोवतीं फिरविला. पण कांहीं नाहीं. तेव्हां तो पुन्हा आपल्या पूर्वजागीं गेला. कारण शैलाही तितक्यांत आपल्या जागेवर जाऊन बसली होती.

" तूं आतां निजतेस ना इथेंच ?"

" नाहीं." शैला एकशब्दी वाक्यांत बोलूं लागली.

" मग काय जाणार तिकडे ? "

" होय, फार वेळ झाला मला."

" पण सोबतीला कोण ? "

" कशाला पाहिजे मला सोबतीला ? "

" तरण्या ताठ्या मुलींनीं रात्रौ काळोखांतून चार मैल चालून जाणं चांगलं का ? "

" कां ? कोणती हरकत ? "

" छट् ! मी बरी धाडीन ? वाईनीं तुझ्या खरं म्हटलं तर पाठवायचं कुणाला तरी. पण बघ आतां तूंच. आतां तरी ओळख. जायचंच असलं तर जा ना सकाळीं. "

" मी आत्तांच जाणार."

" कां ? कोण वाट बघत बसलंय् होय ? "

" हं. "

" हलधर,-तो नांगऱ्या वाट बघतोय वाटतं ? "

" पहिलं हलधर हें नांव काय वाईट ? नांगऱ्याच कशाला म्हटलं पाहिजे हो एखाद्याला ? "

हलधर खाकरला.

" कोण ग बाहेर ? " भद्राबाईनीं विचारलें.

" बघते हं." शैलानें म्हटलें. तिनें आपल्या पिशवींतली छोटी टॉर्च बाहेर काढली व बाहेर फिरवून पाहिलें.

तिला काय दिसलें ?

हलधरची मूर्ति !

हलधर पुढें सरला :

" यायचं आहे ना ? " त्यानें विचारलें.

" हो तर; ही मी निघालें. "

भद्राबाई पुतळ्यासारख्या निश्चल आणि निःशब्द होऊन उभ्या राहिल्या.

बाहेरच्या दरवाजाकडे तोंड करून उंबरठ्यांत उभें राहिलें असतां उजवीकडच्या कोनाड्यांत आंगाची घडी करून लपून बसलेली एक मनुष्याकृति होती. पण तिकडे कोणाचें लक्षच नव्हतें.



प्रकरण सहावें

# पिवळेला कागद

शैला आणि हलधर निघून गेल्यानंतर कांहीं वेळानें भद्राबाई शुद्धीवर आल्या. घडलेल्या प्रकारानें त्या अत्यंत स्तंभित होऊन गेल्या होत्या.

वास्तविक पाहातां आपल्या सावत्र मुलीचें कौतुक करणाऱ्या भद्राबाई इतक्या बिचकून कां जाव्यात ? त्या कांहीं चोरीमारी करीत नव्हत्या. आपल्या मुलीबरोबरच विश्रब्धालाप करीत होत्या ना ? येऊन जाऊन त्यांना चकित व्हावयाला एकच कारण होतें. त्यांच्या भाषणांत हलधरचा उल्लेख एकदोनदा आला होता. आणि हलधरनें तो ऐकला असला तर ?

आपण काय काय बोललों ? हलधर केव्हांपासून येऊन बसून राहिला होता ? तो इतका घरांत येऊन चोरासारखा लपून गुपचुप कां राहिला ? त्याच्या येण्याचा आवाजदेखील कसा आला नाहीं ? पण त्याला यायला मिळालेंच कसें आधीं ? घराचे दोन्ही दरवाजे उघडे कां ठेवले गेले ? आपण कांहीं विशिष्ट हेतूनें महत्त्वाच्या कारणासाठीं जुना नोकर बदलून नवा ठेवला आणि त्याला सावध राहाण्याबद्दल निक्षून सांगितला असतांहि तो असा गाफील कसा राहिला ?

भद्राबाईंची विचारमालिका इतक्यावर येऊन ठेपल्यानंतर साहाजिकपणेंच त्यांना आपल्या नोकराची आठवण झाली. बाई नोकराला त्यांनीं मुद्दामच दूर ठेविलें होतें; दिवाणखान्यांत येऊं दिलें नव्हतें. पुरुष नोकराला बाहेर गुंतविलें होतें. इतकी बंदोबस्ती करून देखील हलधर घरांत शिरला. त्यानें कितीसें पाहिलें आणि कितीसें ऐकलें असेल कोणास ठाऊक असें भद्राबाईंना वाटलें. आपल्या नोकराचा हा गाफिलपणा लक्षांत येतांच त्यांना त्याचा फार राग आला.

त्यांचा नोकर आतां उठून दारापर्यंत आला होता. व्हरांड्यांत दिवा मुद्दामच ठेवला नव्हता. तो भद्राबाईंच्या सांगण्यावरूनच ठेवला नव्हता. बाहेरून काळोख असल्यामुळेंच हलधरला घरांत निमूटपणें शिरतां आलें.

" मीं बरोबर लक्ष ठेवलं आहे." तो नोकर हुषारीनें म्हणाला.

" माझ्याही आलं तें लक्षांत..." भद्राबाई खोचूनच बोलल्या. आंतून त्यांचा संताप वाढत होता.

भद्राबाईंच्या उत्तरानें नोकर उत्तेजित झाला.

" बाहेर पडायच्या आधीं तो या इकडच्या बाजूस काळोखांत आला होता. तेव्हां इथें पडलेला एक कसलासा कागद त्यानं उचलून घेऊन खिशांत टाकला.–हो, मीं पाहिलंच तें."

" पण तो आला कसा आंत ?" भद्राबाईनीं त्याला दरडावून विचारलें.

" तो सरळ दारांतूनच आला. त्यांत कांहीं विशेष नाहीं."

" बेवकूब ! पाजी ! बेशरम !"

" अं ?"

" दरवाजा बंद करून कां नाहीं घेतलास ?"

" मला आपण तसं सांगितलं नव्हतं. येणाऱ्या जाणाऱ्यावर नीट लक्ष ठेव, असं आपण मला बजावलं होतं, बाईसाहेब !" नोकर भीत भीत अदबीनें म्हणाला.

" म्हणजे इतकं सांगितल्यावर दरवाजे बंद करून घे म्हणून निराळं सांगावं लागतं वाटतं ? बेअक्कल !"

" पण एखाद्या रात्रीं दरवाजा बंद करूं नको असं देखील आपण सांगतां ना ?" नोकरानें विचारलें.

" बस्स !" भद्राबाईनीं जबरीनें दटावलें, " तुला अक्कल नाहीं हेंच खरं. भय्या म्हणून ठेवला. शरीर आहे माणूस जातीचं, पण डोकं आहे पशूचं !"

कांहीं वेळ स्तब्धतेंत गेला. पण लगेच मग तो नोकर चढ्या आवाजांत म्हणाला,

" एक दिवस दरवाजा उघडा ठेवायचा, एक दिवस झाकून घ्यायचा. एक दिवस एखाद्याला आंत घ्यायचा, एक दिवस एखाद्याला नाहीं घ्यायचा. पण कोणाला सोडायचा आणि कोणाला नाहीं सोडायचा याचं कांहींच सांगणं नाहीं. अशा स्थितींत आपल्याच्यानें नोकरी होणार नाहीं. माझ्या झाल्या दिवसांचा पगार चुकता होऊं द्या. मी निघून जाईन हिंदुस्थानला." नोकर जरासा ताठरपणानेंच म्हणाला. त्याचें सगळें बोलणें हिंदुस्थानींतच चाललें होतें.

भद्राबाई ऱ्याच वरमल्या. त्या चरफडत चरफडत स्वतःच दरवाजे बंद करून घेऊन घरांत गेल्या.

हलधरनें जें कांहीं ऐकलें त्याचा परिणाम त्याच्या मनावर झालेला लवकर पुसून जाणें शक्य नव्हतें. त्यानें शेखरचें नांव भद्राबाईच्या तोंडून ऐकलें होतें. अगदीं पहिल्या भेटीच्या वेळीं खुद्द शेखरनें तर तिला आपली प्रणयदेवताच मानली होती. तो प्रसंग त्याला या वेळीं अगदीं ताज्या स्वरूपांत आठवला. पण त्या वेळीं शेखरच्या तोंडून आणखी एक दोन नांवें त्यानें ऐकिलीं होतीं. त्यांचें तो स्मरण करूं लागला. एक साखरदांडे आणि दुसरें प्रो. लंवगे. पण यांपैकीं फक्त शेखरचाच पत्रव्यवहार अद्याप सुरू आहे. दुसऱ्या दोघांचे बंद पडले असावेत अथवा सुरू असले तरी ते आपल्या दृष्टोत्पत्तीस आले नसावेत आणि शेखरचीं पत्रें तरी आपण आजवर कोठें पाहिलीं होतीं? शैला खरोखरच असहाय होती काय? शेखरचें जर तिला सहाय्य होतें, तर तिनें तसें स्पष्टच आपणांला एका शब्दानें देखील कां बरें पूर्वी कधींच सांगूं नये? इत्यादि विचारतरंगांच्या भाराखाली त्याचें मस्तक आणि हृदय त्या रात्रीं गुदमरून गेलें होतें.

त्या रात्री हलधर आणि शैला यांचें परस्परांशीं कांहींच बोलणें झालें नाहीं. दोघांनींही मौन स्वीकारलें होतें. रात्रीं तीं घराकडे गेल्यानंतर त्यांचे बिछाने एकाच खोलींत नोकरांनीं घालून ठेवले होते. खोलींत जातांना नोकरांनीं त्यांना पाहिलें होतें. नोकर माणसांनीं बाईच्या कानाला लागून पुटपुटून कांहींसें सांगितलें. पराकाष्ठेचा हर्ष झालेला प्रेमळ बाईच्या मुखावर उमटला. ती सुखानें झोपीं गेली. नोकर माणसेंही सुखानें झोपेंत मग्न झालीं होतीं. पण हलधर...?

...आणि शैला?

तीं दोघेंही या कुशीवरून त्या कुशीवर दीर्घ उसासे टाकीत रात्र कंठीत होतीं.

सारें जग विश्रांतिसुखाचा लाभ घेत होतें.

दुसऱ्या दिवशीं पोस्टमन येऊन त्यानें मनीऑर्डर दिल्यावर शैलानें ती वाचून पाहिली व न घेतां परत केली. पत्र मात्र हलधरनें तिच्याकडे दिलेलें तिनें वाचून पाहिलें होतें. त्याचें उत्तर तिनें पाठविल्याचें हलधरनें पाहिलें. कारण हलधरचें टपाल पोस्टांत टाकणारा बुधोजी. शैलानें त्याच्याकडेच शेखरला लिहिलेलें पत्र पोस्टांत टाकण्याकरितां नेहमींप्रमाणें दिलेलें होतें.

शेखरनें शैलाला काय लिहिलें असेल आणि शैलानें काय उत्तर पाठविलें असेल हें जाणण्याची इच्छा हलधरला झाली तर तें साहाजिकच होतें. तो पत्रव्यवहार तिनें आपल्याला दाखविलाच पाहिजे म्हणून तिला तसें करण्यास भाग पाडणें योग्य नव्हतें. असें असलें तरी त्या पत्रव्यवहाराचा आपल्याकडे नुसता निर्देश देखील शैलानें करूं नये हें मात्र हलधरला अस्वाभाविक वाटलें.

मार्गशीर्ष महिन्याचे दिवस होते. दत्तजयंति होऊन गेली होती. जिकडे तिकडे आंब्याच्या झाडांना मोहोर येऊन तीं शोभिवंत दिसूं लागलीं होतीं. कित्येकांना कैऱ्याही लागल्या होत्या. जीं झाडें रायवळ होतीं, त्यांची कैरी काढून मुंबईला पाठविण्याचें काम हलधरनें पत्करिलें होतें. रायवळ झाडांत ज्यांचीं फळें पिकल्यावर गोड निघत नसत, त्याच झाडांची कैरी पाठविणें आर्थिक दृष्ट्या योग्य होतें. याच पंधरवड्यांत नारळांचा पाडा होता. माडांवर चढून नारळ पाडण्यासाठीं बंदरकांठचा एक पाडाव्या हलधरनें बोलावला होता. पण त्याला मध्येंच घरून बोलावणें आल्यामुळें दहावीस झाडें पाडावयाचीं राहिलीं होतीं. हलधर स्वतःच चढून तीं पाडण्याचा बेत मनांत करीत होता. शेतांतलें काम करण्यासाठीं त्यानें कांहीं बाहेरगांवाहून व कांहीं फिरस्ते मजूर मिळविले होते. पण माडांवर चढून नारळ पाडण्याचें काम अस्सल कोंकणच्या पाडाव्याशिवाय करतां येणें शक्य नाहीं.

हलधर मराठी शाळेंत असतांना, म्हणजे वयाच्या सरासरी अकराव्या वर्षी प्रथम माडावर चढला होता. सुमारें पांच सात हात चढल्यावर तो थकला आणि खालीं उतरला. दुसऱ्या दिवशीं त्यानें पुन्हा प्रयत्न केला, तो पायांत खाडूं धरून केला. या खेपेस त्यानें लहानसा कवाथाच चढण्यासाठीं पसंत केला. तो कवाळ्यापर्यंत चढला. कवाळ्यांतील झापास धरून तो राहिला होता. इतक्यांत बाईनीं, त्याच्या आईनें, त्याला पाहिलें. त्या कवाथ्याखालींच येऊन उभ्या राहिल्या आणि त्यांनीं आकाशपाताळ एक केलें. हलधरला झराझर खालीं उतरणें भाग पडलें. त्याला आईकडून खूप बोलून घ्यावें लागलें. नंतर त्याला माडावर चढण्यांत मजा वाटूं लागली व तो त्याला छंदच जडला. नंतर आईही त्याला रागवेनाशी झाली.

हायस्कूलला व कॉलेजला रजा पडून तो घरीं आल्यानंतर लाठीनें पाणी काढी, माडावर चढून नारळ पाडी व आंबे उतरीत असे. या तीनही कामांत त्याला पराकाष्ठेचा आनंद होई.

दहावीस माड पाडावयाचे राहिले होते. तो माडावर चढूं लागणार होता. पण आपण आज माडांवर चढणार आहोंत हें आपल्या आईला कळूं नये अशी त्याची इच्छा होती. म्हणून त्यानें आपला बेत कोणासच कळूं दिला नव्हता. कैरी पाडण्याचें काम संपल्यावर त्यानें मजुरास करंड्या भरण्यासाठीं पाठवून दिलें. तो मजूर निघून गेल्यावर हलधरनें पायांतल्या वाहाणा काढून बाजूस ठेवल्या. चड्डीवर खाकी मांडचोळणा घातला होताच. कंबरेला आंकडीकोयता अडकवला. पायांत खाडूं धरलें व तो माडावर चढूं लागला.

माडावर चढण्यांत गंमत वाटते खरी, पण तें गमतीकरितां म्हणून चढलें तरच. त्यानें तीन चार माडांचे नारळ पाडले आणि तो पांचव्या माडावर चढला होता. हा माड बराच उंच होता, पण त्याची वाढ तिरकस होती. तो सरळ वाढला नव्हता. त्यामुळें कवाळ्यांत जाऊन त्याला थोडीशी विश्रांति घेणें साध्य होण्यासारखें होतें.

घराकडून अजमासें दीड फर्लोंगावर नदीकांठावर ही नारळीची बागाईत होती. सकाळचे साडेदहा वाजून गेले होते. चार माडांवर अगोदरच चढल्यामुळें तो थकून गेला होता. या पांचव्या माडाच्या कवाळ्यावरून त्याला आजूबाजूचा कित्येक मैलांवरचा देखावा दिसत होता.

त्यानें कवाळा न्याहाळून पाहिला. नारळी बागाईत कुळांकडची सुटून त्याच्या स्वतःच्या हातीं आल्यानंतर नारळींना आलेल्या जोमदार शेल्या तो पाहात राहिला होता. गेल्या दोनतीन वर्षांत घडलेला प्रकार सुखपरिणामी होणार कीं काय याचा विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागला होता.

भागेल्याकडे माड असले, कीं त्यांची जोपासना चांगली न होतां झाडें दिवसेंदिवस कमकुवत होत जातात आणि उत्पन्न तुटत जातें. धनी लोक कुळांनीं अमुक नारळी झाडांबद्दल अमुक इतके नारळ खंडादाखल द्यावयाचे अशा शर्तीवर भागेलपणास नारळी झाडें देत असतात. तितक्या संख्येची भरती करतांना कुळें कोवळे नारळ देखील पाडीत असतात. त्यामुळें नारळी झाडें कमकुवत होतात. ही खंडाची नारळांची संख्या वाजवीहून जास्त असली तर त्याबद्दल कुळास दोष देतां येणार नाहीं. पण कुळें आपलाही प्रपंच याच झाडांवर चालवीत असल्यामुळें व त्यांना मालकाइतकी त्या झाडांची कळकळ वाटत नसल्यामुळें, आपल्याला जो फायदा व्हावयाचा त्याहून जास्त भोगावयाची इच्छा झाली, तर कुळें कोवळे नारळ पाडून खंडाची भरपाई करीत असतात. हे नारळ

कुळांनीं नारळाच्या व्यापाऱ्यास परस्पर घालावयाचे व त्यांची किंमत त्या व्यापाऱ्यानें धन्याच्या खात्यास जमा धरावयाची अशी बागाइती गांवांत वहिवाट असते व ह्या वहिवाटीमुळेंच कोवळीं फळें पाडणें भागेल्यांच्या स्वार्थदृष्टीला सोइस्कर वाटतें.

ज्याप्रमाणें जिराइती व भरडी त्याचप्रमाणें बागाइती जमिनी कुळांनीं संप करून पड टाकल्यामुळें हलधरला प्राप्त परिस्थितीला तोंड देणें भाग पडलें होतें. स्वतःच्या हिंमतीवर सर्वच जमिनी सारख्या लक्षपूर्वक लागवड करणें हलधरला शक्य नव्हतें. पण ज्या जमिनी लागवड करतां येतील त्या मेहनतीनें, काळजीनें, पायाशुद्ध रीतीनें, सशास्त्र पद्धतीनें, तात्पुरत्या उत्पन्नावर दृष्टि न ठेवतां जमिनीचा कस वाढत राहील अशा युक्तीनें करावयास त्यानें सुरुवात केल्यामुळें आरंभीं जरी तूट आली व सरकार धारा आंगट भरावा लागला, तरी आस्ते आस्ते त्याला नफा होऊं लागला होता व यापुढें तो वाढत जाणार होता.

आपल्याला जर कधीं लग्न करावयाचें असेल तर जिला शेतीभाती करणें कमीपणाचें वाटणार नाहीं अशा स्त्रीशींच करावें अशी हलधरची इच्छा होती. अगदीं पहिल्याच भेटीला शैलाचे जे विचार हलधरला ऐकूं आले ते त्याच्या हृदयांत दृढमूल होऊन बसले होते. म्हणून प्रायोगिक स्वरूपाचा कां होईना पण शैलाशींच विवाह करण्यास हलधरचें मन तयार झालें. कारण विवाहाचा हा नवा नमुना यशस्वी होईल अशी हलधरला एक प्रकारें खात्री वाटत होती. पण...

...पण शेखरनें जी मागणी शैलाला घातली होती ती शैलानें नाकारली असल्यास, अद्याप पत्रव्यवहार चालू राहिला होता, तो कोणत्या स्वरूपाचा ? येथेंच हलधरची विचारमालिका येऊन थबकत असे. शिवाय त्या रात्रीं भय्यासाहेबांच्या! बंगल्यावर रात्रींच्या वेळीं जें चमत्कारिक दृश्य दिसलें व अतर्क्य संभाषण ऐकूं आलें, त्याचे धागेदोरे कोठपर्यंत जाऊन अडकले आहेत, याचाही उलगडा हलधरला होत नव्हता.

पण त्यानंतरच्या एका घरगुती प्रसंगाची हलधरला आठवण झाली. मुंबईहून आल्यानंतर कांहीं दिवसांनीं बाईनीं सत्याग्रह करून आपल्या घरांत एक विधि घडवून आणला. तिनें सूनमुख पाहिलें खरें पण मुलाचा विवाहविधि पाहिला नव्हता. यासाठीं एक दिवस ब्राह्मणास बोलावून चांगला शुभयोग पाहून होम आणि मंगलसूत्रबंधनविधि तिनें करवून घेतला. हलधरनें शैलाच्या गळ्यांत मंगलसूत्र बांधलें आणि मग उभयतांनीं बाईंना नमस्कार केला. त्या वेळीं बाईंना आपल्या आयुष्याचें सार्थक झाल्यासारखें वाटलें आणि त्या नातवंडाच्या दर्शनाची वाट पाहूं लागल्या.

शैला घरकामांत बाईंना हातभार लावण्यास तयार असे, पण बाईच तिला घरांत कामाला लावीत नसत. तेव्हां शैला हलधरच्या कामांत हातभार लावावयास अगर बागबगीच्यांत कांहींतरी काम करावयास जात असे.

हलधर माडावर चढून नारळ पाडीत होता. नारळ पाडून झाल्यावर त्यानें झापें तोडलीं, पोयपिसुंद्री काढली व तो गमतीनें सभोवार पाहूं लागला.

त्याच्या मनांत या क्षणीं पुनः आश्चर्य उत्पन्न झालें होतें. शैलानें आढेवेढे न घेतां आपल्या हातून जर मंगळसूत्र बांधून घेतलें, तर तिच्याबद्दल आपण तर्ककुतर्क कां म्हणून करीत बसावें ?

हा विचार त्याच्या मनांत ज्या क्षणीं आला, त्याच क्षणीं त्यानें खालीं उतरावयास सुरुवात करण्यापूर्वी सभोवार दृष्टिक्षेप केला. आपल्या घराच्या दिशेस त्यानें दृष्टि वळविली, तों शैला घाईघाईनें नारळीबागेकडे येत असलेली त्याला दिसली. इतक्यांत तो झरझर खालीं उतरूं लागला होता.

पण शैलाला पाहिल्यावर तो पुनः वर चढला.

त्यानें पुनः शैलाकडे पाहिलें.

शैला हलधरलाच चोहीकडे नजर फिरवून शोधीत होती. नारळीबागेंत नारळ सांठवायचा व सामानसुमान ठेवायचा हलधरचा मांगर होता. त्या मांगराच्या रोखानें ती चालत होती.

हलधर वर चढला आणि त्यानें एक शहाळें काढून खालीं टाकलें.

शहाळें पडल्याचा आवाज ऐकल्यावर शैलानें आपली दिशा बदलली. मांगराकडे न जातां जेथें शहाळें पडलें त्या जागेच्या रोखानें ती चालूं लागली.

हलधर झरझर उतरूं लागला.

तो माडाच्या मुळांत उतरला, तेव्हां शैला बरीच जवळ आली होती. तिच्या हातांत कसला तरी पिवळेलासा कागद दिसला.

पण त्या कागदाकडे फारसें लक्ष न देतां हलधर मांगराच्या पडवींत जाऊं लागला. शैलाही त्याच्या मागोमाग तिकडेच जाऊं लागली. हलधर नारळीबागेंत गेला असल्याचें तिला घरीं समजलें होतें. ल्हानपणापासून माडांवर चढणाऱ्या लोकांसही तिनें पाहिलें होतें. पण वैमानिकाचा अगर डफरीन जहाजावर नाविकाचा अभ्यास करणारा विद्यार्थी

आपला विवक्षित पद्धतीचा पोषाख ज्या डौलानें मिरवतो, त्याच डौलांत हलधर माडावर चढण्याचा पेहराव बिनदिक्कत मिरवत असल्याचें पाहून शैलाला मनापासून मौज वाटली व ती त्याच्याकडे आदरयुक्त कुतूहलानें पाहूं लागली.

हलधर सुळक्यावर शहाळें खसाखस सोलीत होता.

शैला फोटोग्राफरच्या अथवा एकाद्या चित्रकाराच्या दृष्टीनें हलधरकडे पाहात होती.

" छान—छान " ती उद्गारली.

" काय तें, शैला ? " हलधर म्हणाला. त्यानें सोडणें बाजूला फेकून देऊन शहाळें निटावलें होतें. कंबरेच्या आंकडींतून त्यानें कोयता काढून घेतला आणि टॅंबली मारण्या-करितां तो शहाळ्याकडे पाहातच बोलत होता.

" नव्हे; म्हटलं फोटो घ्यायला पोझ् चांगली आहे तुमची." शैला बोलली.

" अस्सं ? म्हणजे कोणत्या दृष्टीनें ? " हें विचारीत असतां त्यानें टॅंबली मारून शहाळें शैलाच्या ओठांजवळ नेलें पण ती चटकन् एक पाऊल मागें सरकली.

" पण मघांची पोझ बदलली ना ? " तिनें म्हटलें.

" तरी ही देखील मघांहून छान आहे ! " ती सूक्ष्मपणें पाहात म्हणाली.

" ती कशी काय ? " असें म्हणून त्यानें पुन्हा तो अमृतानें भरलेला पेला तिच्या ओठांजवळ नेला.

" तुम्हांला कुठें आहे दुसरं ! "

" तें काय तिथें ? आतां सोलून घेतोंच ना ? "

" नाऽऽरियल पाऽणीवालाऽऽ ! " असें गमतीनें म्हणत ती खदखदा हसली.

" असं तूं नाहीं म्हणायचं शैला ! तसं मीं म्हणायचं ! " असें बोलून हलधरनें बॅकबेवरील आठवण होईल असें थेट नारळवाल्याचें अनुकरण केलें.

" अं हं ! 'पाणीवाला नारळवाला' हें नांव या चित्राला अगदीं शोभून दिसेल."

" म्हणजे माझ्या या वेळच्या पोझ्ला ना ? " हलधरनें विचारलें.

" हो. "

" हें पाहा शैला ! " कांहीं तरी बोलण्याचा उपक्रम करीत हलधर तत्त्वज्ञान्याच्या दृष्टीनें आकाशाकडे पाहूं लागला.

शैलानें शहाळें हलधरच्या हातून आपल्या हातांत घेतलें, पण ती तें प्याली नाहीं.

हलधर दुसरें शहाळें घेऊन सोलूं लागला होता.

" शैला, आपल्या कृति आणि शब्द जसे चित्रगुप्ताच्या वहींत नोंदले जातात, तशा हालचाली देखील चित्रगुप्ताच्या चित्रफलकावर उमटून राहात असाव्यात, असं जर आपण गृहीत धरलं, तर आपणा दोघांची या वेळची पोझ चित्रफलकावर उमटून शाश्वत झालेली मला जन्मोजन्मीं पाहावयास मिळाल्यास धन्यता वाटेल."

हें वाक्य नारळ सोलीत असतांना प्रत्येक आघाताच्या अनुरोधानें तो बोलत होता.

शैलाला एक आत्यंतिक सुखाचा क्षण आपण अनुभवीत आहोंत असें वाटलें.

हल्लीं कांहीं दिवस शैलाच्या मनाला एक हुरहूर लागून राहिली होती. ती आज प्रथम याच क्षणीं कोठच्या कोठें दूर पळाली. बाईंनीं शैलाच्या गळ्यांत हलधरकरवीं मंगळसूत्र बांधविलें होतें. बाईंवर शैलाची निरतिशय भक्ति म्हणूनच ती त्या गोष्टीस चटकन् प्रथम कबूल झाली. मागाहून तिला आपण चूक केली असें वाटलें. पण बाईंचें मन दुखावेल या भीतीनें तिनें आपली इच्छा बाजूस सारून त्या तांत्रिक प्रकाराला आळा घातला नाहीं. बाईंच्या म्हणण्याप्रमाणेंच होऊं दिलें.

त्या मंगळसूत्रबंधनाच्या प्रकारानें विवाहाला एक प्रकारचा कायमपणा येतो अशी भावना शैलाच्या मनांत डोकावत असल्यामुळें ती तिला केव्हां केव्हां बेचैन करीत असे. कारण त्या दोघांनीं आपसांत ठरविलेल्या नव्या नमुन्याच्या विवाहप्रकाराला ती भावना थोडीशी प्रतिबंधक होती.

पण तीच भावना या क्षणीं शैलाला सुखकारक वाटली. पोहण्याच्या शर्यतींतला तिनें जो फोटो पूर्वी पाहिला होता त्याहून देखील मर्दानीपणाची कणखर व बांधेसूद झाक या वेळच्या हलधरच्या अवयवांच्या ठेवणींत शैलाला दिसली. तिला त्याचा आंगबांधा फारच आवडला आणि ती निर्मळ, गोड, उदार वागणूक तर त्याहून मोहक होती.

तिनें स्वतःच्या मनाचा धिःकार देखील केला या वेळीं. आपल्या गळ्यांत मंगळसूत्र जें बांधलें गेलें, त्या घटनेमागें हलधरचा लपलेला हात असेल काय ! अशी शंका शैलाला क्षणोक्षणीं डिवचीत असे. आपल्या आईला पुढें करून तर त्यानें हें घडविलें नसेल ना, अशी कल्पना तिला त्रासून सोडी. पण हलधरचें सरळ वर्तन आणि निष्पाप, मोकळें

मन पाहून ती या वेळीं शांत झाली. शहाळ्याच्या पाण्याच्या घोटाचा गोडवा आणि गारवा हलधरच्या वृत्तीपुढें फिकाच पडला.

दुसरें शहाळें हलधरनें पुन्हा शैलेच्याच समोर धरलें.

" तुम्हांला नाहीं घेणार ? "

" प्रसाद म्हणून घ्यायचं." हलधरनें म्हटलें.

" तर मग हेंच घ्या ना ! " असें हसत म्हणून शैलानें आपल्या हातांतलें शहाळें हलधरच्या पुढें केलें.

" उपकृतोऽस्मि !" हसत हलधरनें म्हटलें.

" म्हणजे ? मी देवी का आहें ? " शैलानें विचारलें.

" अर्थात् ! नुसती देवी नव्हे, तर कुलस्वामिनी."

" तें कसं काय ? " भ्रुकुटि उडवीत शैलानें विचारलें.

" या नारळीबागेची मेहनतमशागत करणारा रयत जो मी, तो एक कूळ आहें आणि तूं धनीण आहेस. या आपल्या नारळीबागेंत पायधूळ झाडल्याबद्दल कूळ या नात्यानें मी स्वामिनीचं स्वागत करीत आहें. "

" ह्या अर्थानें मला कुलस्वामिनी म्हटलंत होय ? नाहींतर म्हटलं हें भलतंच विशेषण मलां कसं चिकटवलंत ? " ती पाणी पिऊं लागली.

किती मधुर आणि रुचकर तें शहाळ्याचें पाणी ! कोंकणच्या लोकांना निकस जमिनीपासून होणाऱ्या दारिद्र्यःदुखाच्या वेदनांनीं निस्त्राण करूं नये म्हणून देवांनीं दयेनें स्वर्गांतून पाठविलेला अमृताचा कलशच जणूं !

" दुसऱ्या अर्थानेंही माझं म्हणणं सार्थ असल्याचं मी सिद्ध करून द्यायला तयार आहें."

हलधरच्या जिव्हेवर सरस्वती अवतरल्यासारखें शैलाला वाटलें. दुसरा कोणता अर्थ हलधर कसा लावून दाखवतो तें ऐकण्याची शैलाची उत्सुकता वाढली.

हलधरनें तोंपर्यंत शहाळ्याच्या पाण्याचे दोन घोट घेतले. त्या पाण्याचे दोन चार थेंब त्याच्या भरदार उघड्या छातीवर पडले. निढळावर जो घाम निथळला होता तो त्यानें बोलतां बोलतां नुकताच पुसून टाकला होता. पण छातीवरील घामाचा एक लहानसा ओघळ तेथील विरळ केसांतून वाट काढीत चालला होता, त्यांत ते थेंब

मिसळून गेले. माडावरून उतरण्याच्या श्रमानें हलधरच्या गौर वर्णाला लालसरपणा आला होता आणि छातीच्या उजवा भाग किंचित खरचटल्यामुळें लालसर झाला होता.

पाणी पीत असतां शैलाची दृष्टि त्या खरचटलेल्या भागापर्यंत फिरत आली.

“ खरंच ! माडावर चढण्याचं हें कौशल्यही तुम्हीं संपादन केलेलं आहे म्हणायचं. पण नवखेपणा दिसतोय बरं ! खरचटून घेतलंय ! ”

“ तें चालायचंच. पण तो लखोटा कीं काय तें गळून पडलं ? तारेचं पाकीट तर नव्हे ? ”

“ हो खरंच ! तारच आली आहे आपल्या नांवची. मीं सही करून घेतली आणि द्यायला आलें घाईघाईनें ! ”

“ ओहो ! केवढी पण घाई ? घाईनें आणली तशी घाईनेंच दिली तार मला ! ”

“ देणारच होतें आतां शहाळ्याचं पाणी प्याल्यावर. पण मी कुलस्वामिनी कशी म्हणालांत ऐकूं द्या तर खरं.”

“ पण तो अर्थ तुला आवडणार नाहीं.”

“ कां बरं ? ”

“ आवडेल तर सांगतों. ”

“ दुसरा अर्थ सांगतांच येणार नाहीं.”

“ सांगतों, पण रागावतां नये.”

“ बरं बरं, ऐकूं तर द्या ! ” ती माडाच्या आळ्याजवळच्या एका दगडावरच बसली होती आणि हलधर उभाच होता.

“ कुलस्वामिनी म्हणजे कुळाची...” तो मध्येंच थांबला.

“...कुळाची स्वामिनी. मघांचाच तोच अर्थ. षष्ठीतत्पुरुष समास. ” ती मोठ्यानें हसली.

“ हो, पण कुळाची म्हणजे रयतांची नव्हे, भागेल्यांची नव्हे, तर...” तो पुन्हा अडखळला.

“...तर...तर कशाची ? ”

“ तर वंशाची स्वामिनी.”

" वंशाची ? म्हणजे ? तुमची पूर्वेज ? कुलदेवता..."

" इथून पुढें होणाऱ्या वंशाची, आपल्या दोघांच्या संततीची, आपल्या वंशांतील भावी पिढीची !" इतकें बोलत असतां तो तिच्या चेहऱ्याकडे पाहावयाला धजला नव्हता. हलधरच लाजऱ्या मुलीप्रमाणें खालीं पाहात होता आणि शैला मिजासखोर नवऱ्याप्रमाणें त्याच्याकडे बघत होती.

" अस्सं होय ? त्या पुढच्या गोष्टी, पुढें ठरायच्या आहेत. बाकी दोन अर्थ साधलेत खरे."

एवढ्या शब्दांवरून हलधरची आशा जरी पालवली नसली, तरी तिच्याकडे पाहावयाला त्याला उत्तेजन आलें.

" तार उघडून कां नाहीं पाहिली ? "

" तुमच्या नांवची म्हणून."

" पण तुला हक्कच आहे माझं टपाल बघण्याचा."

" नाहीं, तें मला मुळींच कबूल नाहीं." शैला करारी आवाजानें म्हणाली, " एकमेकांचं टपाल परस्पर पाहाण्याचा आपल्याला – आपणा दोघांना – हक्क आहे असं नाहीं मला वाटत."

" कां ? इतका अविश्वास, गुप्तपणा अथवा परकेपणा कां वाटावा ? मला नाहीं समजत ?"

" तो व्यक्तिगत हक्क आहे प्रत्येकाचा." हें बोलत असतां शब्दांतील मार्दव लुप्त होऊन कठोरपणा वाढत चालला. अगदीं पहिल्या भेटीच्या वेळच्या शैलाच्या आवाजांतील कठोरपणाची आठवण झाली हलधरला या वेळीं.

" पण माझं टपाल तूं पाहिलंस तर मला नाहीं वाईट वाटणार ! करच नाहीं त्याला डर कशाला ?"

हलधरच्या बोलण्यांतली ही खोच शैलाला वर्मीं झोंबली. शेखरचें पत्र आपण हलधरला दाखविलें नाहीं, म्हणून तो अशी आडून गोळी मारीत आहे, हें तिनें ओळखलें.

" हलधर, मी तुम्हांला एकदाच सांगून टाकतें, कीं शेखरला मी एक परिचित समजतें. याहून जास्ती कांहीं नाहीं. आपापल्या परिचितांशीं पत्रव्यवहार करायला परस्परांनीं परस्परांना मोकळीक ठेवावी, असं आपण पूर्वीच ठरवलं आहे, असं मला वाटतं."

" हो, तसं नव्हे, पण..."

"...पण मला जायचं आहे लवकर घरीं..." असें म्हणून शैला झटकन् सटकली.

" पण पतिपत्नीमध्यें इतका तिऱ्हाईतपणा...?"

" कोण पतिपत्नी ?" वेगानें पुढें जात असतां, पुढचें पाऊल तसेंच ठेवून मान फक्त मागें वळवून शैलानें फणकाऱ्यानें विचारलें. तिच्या गळ्यांतलें मंगळसूत्र हलधरला स्पष्ट दिसत होतें.

" आपण दोघं..."

"...नाहीं, अजून नाहीं."

" तो रजिस्टर विवाह आणि हें गळ्यांतलं मंगळसूत्र..."

" मंगळसूत्र ? मी ठेवीन तोंपर्यंतच तें राहील गळ्यांत. एकूण कुंकमतिलक आणि मंगळसूत्र हे बायकांवर मारलेल्या गुलामगिरीच्या शिक्क्याचे वणच समजायचे तर? अं ? मोठमोठे उदारमतवादी, सरळ वर्तनाचे पुरुषंदखील जर असेच वागत असतील तर इतर नरपशूंची गोष्टच नको."

शैला फणफणतच निघून गेली.

हलधरनें तार उघडून वाचून पाहिली. त्याबरोबर तो प्रस्तुत कलहप्रसंग विसरून शैलाला मोठमोठ्यानें हाका मारूं लागला.

" शैला ! शैला ! थांब..."

असें त्या तारेंत होतें तरी काय ?





“ मंगळसूत्र हे बायकांवर मारलेल्या गुलामगिरीच्या
शिक्क्याचे वणच समजायचे तर ? अं ? ”

[ पृष्ठ ५८

प्रकरण सातवें

# लाल पेन्सिलीच्या खुणा

शैला हाकेच्या पलीकडे पोचली.

मोठ्यानें आरोळी मारल्यास तिला ऐकूं गेलें नसतें असें नाहीं, पण तशी आरोळी हलधरला मारावयाची नव्हती.

हलधरच्या मनांत शैलाच्या खोल विचारांचा थांग काढावयाचा होता. ती आणखी कांहीं वेळ उभी राहिली असती आणि बोलतां बोलतां विषयान्तर झालें नसतें, तर बॅकबेवर अगर कोंकणलाईनच्या आगबोटींत रत्नागिरी बंदरावर विकत मिळणारें शहाळें आणि स्वतःच्या घामानें शिंपडलेल्या माडाचें व स्वतःच्या हातांनीं काढून, सोलून व फोडून प्रेमानें दिलेलें शहाळें यांतील फरक बोलून दाखविण्याचा आपला विचार तेथल्या तेथेंच कसा राहून गेला याची आठवण होऊन हलधर विषण्ण झाला.

'शब्दांची बडबड ही पोकळ, वायफळ व कृत्रिम जरी असली, तरी मूक भावनांचा आविष्कार शब्दांनीं केव्हां ना केव्हां तरी करावाच लागतो, त्याशिवाय प्रेमाला लज्जतच येत नाहीं. पण त्यांतही कमी खुबी असते असं मात्र नाहीं.

'आपल्यापाशीं ती खुबी नाहीं म्हणूनच आपण हा असा प्रसंग ओढवून घेतला. आपला दोघांचा पतिपत्नीपणा तिला अद्याप संमत होत नाहीं. जगाच्या दृष्टीनें आपण पतिपत्नी असलों तरी स्वतःच्या दृष्टीनें कुठें आहोंत तशीं ? तिला त्या गोष्टीची पर्वा नसली तर आपण तरी ती कां धरावी ?

'पण जगाच्या दृष्टीला दाखवायचं नाटक सूत्रबद्धपणें कायम राखलं पाहिजे ना ? तसें तें दाखवायला ती अडथळा तर आणणार नाहीं ना ? असले भलते अडथळे उत्पन्न करण्याइतकी ती वेडी नाहीं. उलटपक्षीं ती प्रेमळ आहे.'

अशा प्रकारचे विचार मनांत घोळवीत असतांच त्यानें तारेच्या मजकुरावरून पुन्हा नजर फिरविली. तारेंतील मजकूर वाचून त्याला एक प्रकारचा हुरूप चढलेला दिसला. पण पुन्हा तो चिंतामग्न झाला.

'कारण आतां जो प्रसंग येणार आहे त्यांत शैला मनापासून भाग घेईल कीं नाहीं ?

आतांच तर ती रागावून गेली आहे आणि ही परकी मंडळी दोन दिवसांत आल्यावर त्यांचा पाहुणचार करण्याचं बेमालूम जुळायचं कसं ?

' पण आजपर्यंत आलेल्या निरनिराळ्या प्रसंगांना जर आपण दाद दिली नाहीं, तर आतांच काय म्हणून डरणार ? शैला मोकळ्या मनाची आणि हातांत घेतलेलं काम धडाक्यानें शेवटास नेणारी आहे. अशा तऱ्हेचं माणूस सद्गुणांच्या जोरावर वश करून घेतां येणं शक्य असतं, कारण त्याची वागणूक आंत एक आणि बाहेर एक अशा पद्धतीची नसतं. अशा स्त्रीची सोबत आपल्याला आयुष्यभर लाभेल तर किती छान होईल.

' वैषयिक भोगाची कल्पनाही मनांत टिकूं न देतां दोघा स्त्रीपुरुषांनीं पतिपत्नी म्हणून आयुष्य कंठणं शक्य आहे का ? असला प्रयोग जगाच्या उत्पत्तीपासून आतांपर्यंत कुणीं कधीं तरी करून पाहिला असेल का ? आणि करून पाहिलाच तर तो यशस्वी होण्यासारखा आहे का ?

' पण शैला ध्येयवादी आहे. ती पितृविहीन आहे. सावत्रआईच्या मत्सराचा विषय होऊन राहिलेली असायची ! तिच्या वर्तनांत क्वचित् सुसंगति नसली, तर आपण तिकडे थोडंसं दुर्लक्ष केलं पाहिजे. आजपर्यंतच्या आयुष्यांत आपण जशा कांहीं अशक्य कोटींतील गोष्टी शक्य करून दाखविल्या, तशीच किंबहुना त्याहूनही दुर्घट अशी ही एक गोष्ट आहे. यांत जर आपण यशस्वी झालों तरच आपली कर्तबगारी खरी. वैषयिक सुखाचा प्रश्न घटकाभर बाजूसच ठेवूं. पण शैलाचं मन जिंकण्याइतकी पात्रता आपल्या ठिकाणीं आली पाहिजे. तिनें आपल्याविषयीं आदर बाळगला पाहिजे. आपण तिला प्रिय झालं पाहिजे. तरच आपला खरा पुरुषार्थ.'

अशा विचारमालिकेचे मणी हलधर ओढीत असतां त्याची दृष्टि पुन्हा हातांतल्या तारेकडे गेली. शहाळ्यांतलें कोवळें खोबरें नखांनींच काढून त्यानें खाल्लें होतें. घरीं जाण्याची तो तयारी करीत होता. मुंबई सरकारनें नेमलल्या औद्योगिक पाहाणी करणाऱ्या मंडळीचे लोक आपल्याकडे केव्हां तरी एकदा येणार याची त्याला कल्पना होती. पण ते इतक्या लवकर येतील असा त्याचा अंदाज नव्हता. पण आयत्या वेळीं घाई होऊं नये म्हणून अगोदर जी तयारी करून ठेवतां येण्यासारखी होती ती करून ठेवण्याची योजना त्यानें आखलीच होती. कारण त्या मंडळाच्या सभासदांत त्याचा एक युरोपियन मित्र होता ना. आणि आजची ही तार तरी त्यानेंच पाठविली होती.

" मुंबई प्रांताची आर्थिक व औद्योगिक पाहाणी करण्याकरितां मुंबई सरकारनें एक समति नेमल्याचें जाहीर झालें आहे. सर लक्ष्मीदास भगवानदास यांस या समितीचे अध्यक्ष नेमण्यांत आलें आहे व ×××× कॉलेजचे अर्थशास्त्राचे प्राध्यापक प्रा. पाटील यांस मंत्री म्हणून समितींत घातलें आहे. याशिवाय उद्योग-खात्याचे संचालक सर मेरीवेदरसाहेब यांस या समितींत मुद्दाम समाविष्ट करण्यांत आलें आहे. छोट्या उद्योगधंद्यांची पाहाणी करून शेतकी व मोठे धंदे यांच्या संबंधांत त्यांचें स्थान ठरविणें, आर्थिक उन्नति करण्यासाठीं सरकारला काय करतां येईल तें ठरविणें व ती योजना अमलांत आणण्यास पैसा लागेल त्याची तजवीज कशी करावी हें सुचविणें, तसेंच अशा प्रकारच्या कार्यांत ज्या व्यक्ति एकट्याच अगर संस्था स्थापन करून प्रयत्न करीत असतील त्यांना भेटून, त्यांचें कार्य अवलोकन करून व जरूर तर त्यांची साक्ष घेऊन त्यांच्या मताचा व अनुभवाचा फायदा घेणें आणि अशा व्यक्तींस सरकारला काय मदत करतां येणें शक्य आहे याचाही विचार करणें, वगैरे स्वरूपाचें काम वरील समितीनें करावयाचें आहे. एका वर्षाच्या आंत समितीनें आपला वृत्तान्त सरकारकडे सादर करावयाचा आहे.

" सरकारनें समितीकडे जें कार्य सोपविलें आहे तें अगदीं अगत्याचें आहे, यांत शंकाच नाहीं. जनतेची आर्थिक स्थिति सुधारत नाहीं, ती दिवसेंदिवस वाईट होत आहे, असें स्पष्ट दिसतें. मोठे उद्योगधंदे काढणें, त्यांस मदत करणें हें प्रायः प्रांतिक सरकारच्या हातीं नाहीं. तेव्हां लहान उद्योगधंद्यांची मुख्यतः पाहाणी करण्याचें काम सरकानें हातीं घ्यावें हें योग्य आहे. अशा छोट्या धंद्यांची गरज शेतकऱ्यांस अतिशय आहे. त्या दृष्टीनें या प्रश्नाचा विचार करणारा व शेतकऱ्यांस उपयुक्त होतील अशा धंद्यांची प्रत्यक्ष माहिती असणारा शेतकऱ्यांचा प्रतिनिधि समितींत कोणी असता तर बरें झालें असतें. आमच्या मतें श्रीयुत हलधर गोविंद कुळकर्णी, B. Sc., B. Ag. हे एक गृहस्थ या समितींत घेण्याजोगे आहेत.

" जमीनधारा कमी करणें, पडित जमीन लागवडीखालीं आणणें, शेतकऱ्यांस फावल्या वेळीं उद्योगधंदा देणें, त्या धंद्यांतील तयार मालाच्या उठावाची व्यवस्था करणें, हीं कामें सरकारनें तात्काल हातीं घेतलीं पाहिजेत. जनतेची आर्थिक स्थिति सुधारण्याचा हाच फलदायक मार्ग आहे. ही समिती आपला दौरा लवकर पुरा करून सरकारकडे आपल्या शिफारशी लवकर पाठवील व सरकरही त्या अविलंबानें अमलांत आणण्याची तजवीज करील अशी आशा वाटते."

हा मजकूर कांहीं दिवसांपूर्वी केसरींत आला होता. हलधरच्या तो लक्षांत होता. आजची तार मेरीवेदरसाहेब यांचीच होती. त्या अर्थी हलधरला कौटुंबिक गोष्टी विसरून आपल्या आवडत्या कार्याकडे जास्त लक्ष पुरविणें अगत्याचें झालें. पण प्रस्तुत कार्याचा एक भाग पाहुण्यांचें यथायोग्य स्वागत हा होता. पाहुण्यांच्या स्वागतांत शैलाच्या सहकारितेची आवश्यकता होती आणि शैलाची सहकारिता म्हणजे कौटुंबिक भानगड ! हलधरची कौटुंबिक काळजींतून कोणत्याही कारणानें सुटका होणें अशक्यप्राय होतें.

हलधरनें हातांतील तारेच्या कागदाकडे पुन्हा नजर वळविली. या खेपेस मजकूर न वाचतां फक्त सहीकडेच त्यानें दृष्टिपात केला होता. सही कांहीं मेरीवेदरसाहेबांनीं स्वतः केली नव्हती. तें तारमास्तरचें अक्षर होतें. पण मनाची तहान विलक्षण असते. हलधरला प्रो. मेरीवेदरसाहेबांचें स्मरण होतांच त्याचें हृदय भरून आलें. त्यांचा उमदा व प्रेमळ स्वभाव त्याला आठवला. त्यांची स्वाक्षरी तरी पाहावी अशी त्याच्या मनाला तीव्र लालसा उत्पन्न झाली आणि म्हणूनच त्याची नजर तशी वळली.

‘ किती उदार, किती गुलजार आणि किती सरळ स्वभावाचे मेरीवेदरसाहेब ! इंटर सायन्सच्या वर्गांत असतांना आपली त्यांची प्रथम ओळख झाली. कॉलेजाकॉलेजांतील खेळांच्या सामन्यांत आपण पुढें आल्यामुळें प्रोफेसरसाहेबांचे आपण आवडते झालों. प्रोफेसरसाहेब खेळांचे चहाते होते व खेळाडू वृत्ति त्यांच्यांत नखशिखान्त मुरलेली होती. नंतर आपण प्रोफेसरसाहेबांशीं बॅडमिंटन व टेनिस खेळायला कसे जाऊं लागलों, एका अडचणीच्या प्रसंगीं त्यांनीं आपणांला कशी पैशाची मदत केली होती व मागाहून ते परत करते वेळीं घेण्याची त्यांनीं किती अनिच्छा दर्शविली, मधून मधून मराठी भाषेचा आपण त्या पतिपत्नींना कसा परिचय करून दिला व या सर्व गोष्टींमुळें ते आपले कसे मित्र बनले,’ वगैरे सर्व गोष्टी हलधरला क्रमवार आठवल्या.

‘ आपले मित्र पण आतां पूर्वींहून देखील म्हणजे अर्थशास्त्राच्या जागेहून वरच्या पायरीवर चढलेले प्रो. सर मेरीवेदरसाहेब इतक्या वर्षांनीं आपल्याकडे पाहुणचारास येणार ’ या गोष्टीचा त्याला अतिशय आनंद झाला. ‘पण ते ऐकटेच येणार कीं सपत्नीक येणार ?’

हलधरचे डोळे पुन्हा एकदा तारेच्या कागदाकडे वळले. पण त्यांत कांहींच उल्लेख नव्हता. ‘आम्ही चार सहा दिवसांत येणार आहोंत, निघतांना सविस्तर तार देईन ’ इतकाच मजकूर त्यांत होता.

'पण आपल्या घरीं यायचं तर प्रोफेसरसाहेब सहकुटुंब येणार हें निश्चित होतं कारण त्यांनीं तसं पूर्वी अनेकवार बोलून दाखवलं होतं. मेरीवेदरसाहेबांच्या घरी जेवतांना युरोपियन जेवणाचे अनेक प्रकार आपण कसे चाखले व आपल्याकडील जेवणाचे अनेक प्रकार आपण कसे वर्णिले होते' याची जेव्हां हलधरला आठवण झाली तेव्हां त्याला हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं.

पण लगेच त्याला भ्रांति पडली, कीं 'आतां आपण आपल्या आवडत्या व थोर पाहुण्यांना कसला पाहुणचार करावा? सौ. मेरीवेदर या तर कितीतरी अल्लडवृत्तीच्या. प्रो. मेरीवेदर इंग्लिश आणि मिसेस् मेरीवेदर अमेरिकन. त्या दोघांचे भाषेच्या उच्चारांवर आणि स्पोलिंगांवर हमेशा खटके उडत. पण प्रेमांत वितुष्ट कधींही आलं नाहीं. याचं नांव जोडपं. नाहींतर...

'अरेरे! मेरीवेदर दांपत्याच्या कौटुंबिक सुखाच्या स्मरणामुळेंच पुन्हा कौटुंबिक गोष्टीची आठवण आणि तीही तापदायक!

'मिस्टर आणि मिसेस मेरीवेदर यांच्याप्रमाणें मला आणि शैलाला कां बरं वागतां येऊं नये! त्यांच्यासारखं कौटुंबिक सुख आपणांला कधींतरी लाभणार नाहीं का?'

आपल्या कानशिलांच्या वरील मस्तकाचा दोहीकडचा केसांचा भाग तो दोन्ही हातांनीं चोळीत चोळीत पुढें सरकला. तो पोईच्या कांठावर आला. नदीचें पाणी या पोईंत भरतीच्या वेळीं चढत असे. सुकतीच्या वेळीं पोईंत नदीचें गोडें पाणी राही. याच पोईवर लाठ घातल्याची खूण होती. आतां लाठ उभी नव्हती. फक्त फांपाळें त्या वेळचें अजूनही तसेंच राहिलें होतें.

आतां लाठीची गरज नव्हती. कारण नवीन लावलेले कवाथेही मोठे झाले होते; आणि भागेल्यांनीं बागाईत सोडल्यास एक दोन वर्षे लोटलीं होतीं. ते भागेली आतां कोठें होते? संप करून भागेलपणा सोडून ते मुंबई–कराचीस गिरणींत राहावयास गेले होते. पण तेथें तरी ते सुखी होते काय? तेथें जाऊन तरी त्यांच्या अडचणी दूर झाल्या होत्या काय?

शेतकरीवर्गाच्या हितासाठीं म्हणून निघणाऱ्या वर्तमानपत्रांनीं हलधरवर सडकून टीका केली होती. त्यांपैकीं एका वर्तमानपत्रांत तर खरी वस्तुस्थिति समजून न घेतां हलधरवर जळजळीत आग पाखडण्यांत आली होती. त्या पत्रकाराच्या म्हणण्याप्रमाणें पाहिलें तरीही हलधरनें आपल्या कुळांस हाकलून दिलें नव्हतें. मध्यम वर्गांतील जमीनदार

लोकांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें जमिनी कुळांस लावून हलधरचे आजोबा गांवचें कुळकर्णीपण करीत असत. हलधरचे वडील तें कुळकर्णीपण सोडून बाहेरगांवीं नोकरीस राहिले होते. पण हलधर हा हुषार विद्यार्थी निपजल्यामुळें त्याला स्कॉलरशिप मिळे व पुढेंही त्याला मोठी सरकारी नोकरी मिळण्यासारखी होती, पण त्याचे वडील वारल्यावर तो कॉलेजांत अभ्यास करीत असतां वर्गकलह वाढविणाऱ्या लोकांनीं त्याच्या कुळांत द्वेषाग्नि पसरला. त्यामुळें त्यांनीं संप करून हलधरच्या जमिनी पड टाकल्या. याचा परिणाम बिचाऱ्या हलधरला एक वर्ष भोगावा लागला. कारण तें त्याचें शेवटचें वर्ष असल्यामुळें त्याला घरीं येतां येण्यासारखें नव्हतें. पण या अनुभवामुळें तो जागृत झाला. नोकरीकडे जाणारें त्याचें मन परावृत्त झालें व तें जमीन आणि कुळें या प्रश्नाचा विचार करूं लागलें. म्हणून शेवटच्या वर्षांत परीक्षेपेक्षां देखील प्रत्यक्ष व्यावहारिक पेच कसा सोडवायचा या प्रश्नाचा त्यानें खोल अभ्यास केला.

परीक्षा आटोपून घरीं येतांच त्यानें संप केलेल्या लोकांना बोलावून ज्यांची जमिनी करण्याची खुषी नसेल, त्यांना खुशाल जावयास सांगितलें. ज्यांचीं घरेंच हलधरच्या जमिनींत होतीं त्यांना जातां येणें शक्य नव्हते. पण असे इसम चार दोनच होतें. तेही आंतून हलधरला अनुकूल नव्हतें. संप करणारे लोक बाहेरगांवीं जाऊन स्थिरस्थावर झाल्यावर मागें राहिलेल्यांस बोलावून घेणार होते. अशा रीतीनें संप करणारे जमिनी पड टाकून मुंबई–कराचीस निघून गेले आणि परीक्षा पास होतांच हलधर नोकरी-चाकरीच्या मागें न लागतां तो आपल्या घरीं शेती-बागाईत करावयास राहिला.

सरासरी साडेअकरांचा सुमार होत आला होता. पोईंत उतरून हलधरनें हात धुतले व चूळ भरली. थंड पाण्याचा हात त्यानें तोंडावरून व नंतर छातीवरून देखील फिरविला. त्याबरोबर त्याला छातीवर एके ठिकाणीं चुरचुरल्यासारखें झालें. जेथें खरचटलें होतें तेथें पाण्याचा हात फिरल्यामुळें चुरचुरल्यासारखें झालें. आपल्या छातीवर चांगलेंच खरचटलें असल्याची ती खात्रीच होती. त्याला तो भाग पाहावासा वाटला. गळ्याखालच्या छातीवर कातडी खरचटली होती. पण आरसा कोठें होता ?

निसर्गाचा आरसा तयारच होता. एका दगडावर उभा राहून तो पोईच्या पाण्यांत आपलें प्रतिबिंब पाहूं लागला. त्याला खरचटलेला छातीचा भाग दिसला. आपलें प्रतिबिंब पाहात असतां आपल्या मस्तकावरील नारळीचीं झावळें छत्रीसारखीं सभोवतालीं पसरलेलीं त्याला मोठीं मजेदार दिसलीं. या वेळीं आपल्या शेजारी शैला उभी राहिली

असती, तर हेंच प्रतिबिंब किती मनोहर दिसलें असतें ? किती सुखमय कल्पना ? किती स्वर्गीय ! पण ही कल्पना सत्यसृष्टींत कधींतरी उतरेल का ?

त्यानें चमकून वर पाहिलें. त्याला कोणींतरी हाक मारलेली ऐकूं आली. आपलें प्रतिबिंब पाहाण्याकरितां त्यानें पुन्हा आपली दृष्टि खालीं वळविली. पण हाय ! त्याच्या त्या रम्य प्रतिबिंबरूपी चित्राचे शतशः तुकडे झाले होते !

काय बरें कारण असें होण्याचें ? ओहो ! एका पाणबुड्या नांवाच्या निळ्या पंखांच्या पक्ष्यानें अचानकपणें उडी मारून त्या पोईंतील एक छोटा मासा पकडून चोंचीत धरून नेला. त्या बुडीसरशीं त्या निसर्गदेवतेनें धरलेल्या हलधरच्या आरशांत असंख्य आंदोलनें निर्माण झालीं. तीं संपून पाणी पुन्हा शांत होण्यास बराच वेळ लागणार होता.

त्या प्रतिबिंबांतील झावळांच्या दाटींतून डोकावणाऱ्या आकाशांत ढग निघून जात असलेले त्याला पाण्यांत दिसले. कालपासून आकाशांत असेच ढग येत होते. या दिवसांत असे ढग एकसारखे येत राहिल्यास बागाईतदारांस काळजी वाटते. कारण त्यांमुळें आंब्यांचा आणि काजूंचा मोहोर जळून जातो. हलधरचाही चेहरा किंचित् सचिंत झाला. नारळी बागाइतीच्या बाजूच्या उंचवट्यावरील आंब्याच्या झाडांकडे त्याची नजर वळली, इतक्यांत त्याला पुन्हा आपल्या नांवची हाक ऐकूं आली.

" बाळाछाएब ! " हाक बुट्टोजीनेंच मारली होती.

बुट्टोजीची स्वारी हलधरकडेच येत होती. पाहुण्यांस देण्याकरितां कांहीं लाखी रंगीत मालाचें सामान सावंतवाडीहून आणायला हलधरनें सांगितलें होतें. त्या सामानाची यादी बुट्टोजीनें हलधरच्या हातीं दिली.

" आतांच आलास ? " हलधरनें यादी न वाचतांच विचारलें.

" हो, आल्याबरोब्बरच इकडे आलों."

" तीं नांवं कळलीं का ? "

" कळलीं, पण त्यांचे पत्ते घेऊन मला त्या त्या गांवीं जावं लागलं. पत्ते सावंतवाडीच्या शेतकी खात्याच्या कचेरींत मिळाले. "

" ते लोक कधीं येणार आहेत ? "

" येतील उद्यां—परवां "

कांहीं वेळ कोणीच बोललें नाहीं. नुकत्याच सोललेल्या शहाळ्यांच्या सोडणांकडे बुट्टोजी पाहात होता.

" हें पाहा, मांगरांतील नारळांच्या राशींतील नारळाच्या प्रतवारी लाव. महाल आणि धारे नारळ निरनिराळे कर व त्यांचा आंकडा मला सांग. ते नारळ कोचऱ्याला पाठवायचे आहेत फतेमारीवर चढवायला. कळलं ना ? "

बुट्टोजी मांगराकडे जाऊं लागला. त्याला कसलीशी आठवण होऊन तो मागें परतला इतक्यांत हलधरची नजर कॅशमेमोंतील यादीवर गेली. त्या यादींतील शेवटची वस्तु पाहून तो चमकला.

" ही...ही शेवटची वस्तु...बुट्टोजी !..."

" हाऽहाःहाः—हीःहीःहीःऽऽ " बुट्टोजी हसत सुटला.

यादीवर नजर गेल्यानंतर हलधरच्या तोंडून हा प्रश्न येणार अशी त्याची खात्रीच होती व त्याच क्षणाची तो मोठ्या आतुरतेनें वाट पाहात होता. तो क्षण आलेला पाहातांच त्याला हास्याची उकळी फुटली. तो मागें परतला.

" ती वस्तु आणायला..." तो मध्येंच थांबला.

" मीं नव्हती सांगितली. हा तुझा फाजिलपणा वाटतं ? "

" बाईनीं सुचविली आणायला मला. नि ती वस्तु मला पण आणावीशी वाटली पायजेच ती आतां नाहींतरी."

बुट्टोजी मिष्किलपणानें डोळे मिचकावून हसूं लागला. हसतां हसतां त्यानें एक वर्तमानपत्राचा अंक काढून तो हलधरच्या हातीं दिला. तो मांगराकडे जाऊं लागला.

त्याचे पाय मांगराकडे जावयास वळतांच हलधरनें जवळच्या माडास टेकून त्या यादींतील शेवटच्या वस्तूवरून नजर फिरविली; नंतर क्षणमात्र त्यानें दोन्ही डोळे मिटून धरले व नंतर प्रदीर्घ असा श्वास सोडला.

" बुट्टोजी, मी जातों हं घराकडे. " असें म्हणून हलधर घरीं जावयास निघाला.

जातां जातां त्यानें हातांतील वर्तमानपत्र उघडून पाहिलें. तों त्यांतील एका मोठ्या शीर्षकावर त्याची नजर खिळली. ती त्याच्यावरच टीका होती. हलधरचें नांव मोठ्या टाइपांत छापलेलें होतें. मजकुराभोवतीं तांबड्या पेन्सिलीच्या खुणा होत्या.

हलधरचा चेहरा रागानें लाल झाल्यासारखा दिसला. त्याचा श्वास जोरानें चालू झाला व त्या भरांत त्याचीं पावलेंही झपाझप पडूं लागलीं.

प्रकरण आठवें

# संपाचा पुढारी

हलधरला वर्तमानपत्रांतील मजकूर पाहून प्रथम राग आला, पण त्या रागाचें पर्यवसान लगेच विषण्णतेंत झालें.

शेतकरीवर्गातर्फे चालविण्यांत येणारें तें एक वर्तमान पत्र होतें. शेतकऱ्यांनीं केलेला संप जमीनदारांस पेचांत आणून अधिक सवलती मिळविण्याकरितां व मध्यमवर्गास हें उदाहरण दाखवून दहशत बसविण्याकरितां होता. पण हा खरा मजकूर बाजूस ठेवून त्या पत्रांतील लेखकानें हलधरवर शेतकऱ्यांस पिटाळून लावल्याचा आरोप केलेला होता. तसा आरोप करावयाला कारणही तसेंच झालें होतें.

ज्यांनीं त्या शेतकऱ्यांस जमिनी सोडावयास फूस दिली होती, त्यांनीं त्या लोकांना मुंबईंत नोकऱ्या देण्याचें अभिवचन दिलेलें होतें. पण ते लोक मुंबईस गेल्यावर त्यांना नोकऱ्या कोठेंच मिळेनात. गिरण्यांत तर आधींच जास्त भरती झाली होती. तशांत कांहीं गिरण्यांत मधून मधून कामकऱ्यांचे संप होत असत. त्यामुळें उत्पन्न झालेल्या बेकारींत कोंकणच्या या नवीन आयातीमुळें थोडीशी भरच पडली. आपलेंच जीवन भारभूत झालें असतां पाहुण्यांना कोण कसा पोशील ? फुसलावणारे लोक बाजूला राहिले आणि या नव्या लोकांना आपापल्या ओळखीदेखीच्या अथवा नातलग लोकांकडेच राहून दिवस काढणें भाग पडूं लागलें. अशा लोकांची प्रवृत्ति उदरंभरणासाठीं चोरीकडे आणि जुगाराकडे न झाली तरच नवल ! त्यांना फूस लावून आणणाऱ्या मंडळींतील कांहींजण त्या पत्रकर्त्योच्याच मताचे व त्याच्याच पुढ्यांतले होते. कोंकणांतून आलेले हे नवे बेकार आपणाला आणणाऱ्यांस दोष देऊं लागले असतां, आतां त्या सर्व अपेशाचें खापर हलधरवर फोडण्याशिवाय त्या फुसलाव्या लोकांना गत्यंतरच उरलें नव्हतें. तशांत केसरीनें हलधरची वाखाणणी केलेली पाहातांच या शेतकरी वर्तमानपत्राला आयतीच संधि सापडली. त्या वर्तमानपत्राला माठभरुल्यांच्या शेतकऱ्यांचा फारच पुळका आला !

पण हें सर्व सहन करून हलधरला आपल्या घरीं येणाऱ्या पाहुण्यांच्या स्वागताची तयारी करावयाची होती. राहात्या घराच्या बाजूस लहानशी टुमदार हवेली खास पाहुण्यांकरितां बांधलेली होती. एखादा दुसरा सलगीचा पाहुणा आला तर हलधर

त्याला आपल्या राहात्या घरांतच ठेवीत असे. पण साहेबी पद्धतीचे अधिक पाहुणे आल्याम त्यांची व्यवस्था त्या बंगलींतच तो करी. फक्त डिनरचें टेबल व जेवणाचें सामान त्या हवेलींत नेलें, कीं झालें.

आपले आजपर्यंतचे शोध, निरनिराळे प्रयोग, केलेल्या निरीक्षणांचीं टिपणें व आर्थिक उन्नतीच्या कार्यासाठीं वेळोवेळीं सुचलेले विचार यांचीं टिपणें त्यानें जय्यत तयार करून ठेवलीं.

जे पूर्वीचे भागेली राहिले होते व जे लोक त्यानें नवीन ठेवले होते, त्यांना शिकवलेले निरनिराळे छोटे उद्योगधंदे व त्यांचे नमुने त्यानें तयार ठेवले होते. माडाच्या झाडापासून ज्या व्यापारोपयोगी निरनिराळ्या वस्तु तयार करितां येतात, त्यांचे नमुनेही संग्रहीत करण्यांत आले होते. सावंतवाडी संस्थानांतील कै. श्री. खेमसावंत महाराज यांच्या प्रेमळ आश्रयाखालीं जे लोक घरगुती धंद्यांत प्रवीण म्हणून उघडकीस आले होते, त्यांनाही बोलावून आणुन त्यानें त्यांच्या कलेचा फायदा घेतला होता व आपल्या कांहीं कल्पना त्यानें त्या लोकांना दिलेल्या होत्या. माड व आंबा हीं दोन झाडें मुख्यतः आणि काजू व रातांबी हीं झाडें अंशतः कोंकणच्या लोकांना कशीं तारक होणार हें त्यानें अनेक वेळां आपल्या कामकरी लोकांस शिकविलें होतें.

त्या कामकऱ्यांच्या बायकांस कामधंदे व शिवणकला वगैरे ज्ञान सवडीनुसार हल्लीं शैला देत असे. बुट्टोजीच्या मार्फत साक्षरताप्रसार व वर्तमानपत्र वाचून चालू परिस्थितीचें ज्ञान आपल्या शेतकरी कामकरी लोकांस करून देण्यांत पूर्वीपासूनच हलधरनें फार दक्षता घेतली होती.

एकंदरींत आजपर्यंत घेतलेल्या सर्व परिश्रमांचा इतिहास त्यानें प्रत्यक्ष स्वरूपांत मूर्तिमंत उभा करून ठेवलेला होता. या सर्व तयारींत शैलानें त्याला मनःपूर्वक मदत केलेली होती त्यामुळें त्याला साश्चर्य आनंद वाटत होता.

शैला आपल्यावरील जबाबदारी ओळखून वागत होती. हलधरकडून जरूर ती सर्व माहिती ती विचारून घेई. त्याची प्रयोगशाळा, त्यानें तयार ठेवलेले रोपट्यांचे वाफे, फुलझाडांचीं व फळझाडांचीं कलमें, खतें व रोगनाशक औषधोपाय, नदीवर लावलेला इंजिनचा पंप, पडभरडी जमिनींत केलेल्या लागवडी ही सर्व माहिती तिनें मिळविलीच होती, पण गृहव्यवस्थादेखील नजरेखालून घातली होती.

घरांतील व्यवस्थेची योजना करण्याकरितां जेव्हां तीं फिरूं लागलीं, तेव्हां एका खोलींत सावंतवाडीहून आणलेलें रंगीत सामान त्यांस दिसलें. त्यांत एक घोड्याचा लाकडी रंगीत पाळणा होता. बुट्टोजी खोलीच्या बाहेर उभा होता. हलधर यादीप्रमाणें सामान तपाशीत व कोणा पाहुण्यास कोणती वस्तु द्यावयाची याचें टाचण करीत असतां शैला केव्हांच बाहेर निसटली. माजघरांत शैलाला बाई तिच्याचकडे सोत्सुक नजरेनें पाहात असलेल्या दिसल्या. शैलाच्या या वेळच्या चेहऱ्याकडे पाहून बाई खिन्न झालेल्या होत्या. तें पाहून शैलाची मुद्रा खर्रकन् उतरली. लगेच तिनें आपली वृत्ति पालटली. हलधरबरोबर ती पुढील योजना आखण्यांत पूर्ववत् सामील झाली.

संध्याकाळच्या वेळीं उसाच्या मळ्यांत नदीकांठानें तीं दोघें फिरत होतीं. शैला बोलत होती, पण हलधर फक्त हूं-हूं म्हणत राहिला होता. एखादा शब्द जरासा अलीकडे पलीकडे गेल्यास केव्हां बाईसाहेबांची मिजास गरम होईल याचा नेम नाहीं हें जाणून हलधर जपूनच एखादा शब्द मध्यें टाकीत असे. पाहुणे येऊन जाईपर्यंत तरी आपल्या विवाहाचा तकलुबी डोलारा अढळ राहिला पुरे, एवढीच त्याची मनीषा होती. निष्कपट व प्रेमळ दिसणाऱ्या शैलाच्या मनाची घडण तरी कशी घडली होती याचें कोडें हलधरला उलगडतां उलगडत नव्हतें. हलधर स्वतः तर इतका दिलदार होता, कीं शैलाच्या प्रेमाला तो भुकेला असूनही तिनें स्वतः पुढें पाऊल टाकल्याशिवाय स्वतः ब्र काढण्यास त्याच्या मनाची तयारी नव्हती. परिस्थितीच्या चक्रांत अडकलेल्या तरुणीला गांठून, तिच्यावर उपकारांचें ओझें लादून तिला मिंधी करून मग तिला आपली बायको केली, असला स्वार्थीपणाचा आरोप ऐकून घ्यावयास तो तयार नव्हता. प्रेम स्वयंस्फूर्त असतें. स्वयंप्रेरणेनें वाहाणारा तो निर्मळ निर्झर आहे. शैलानें स्वेच्छेनें आपला स्वीकार केला नाहीं, तर लग्न मोडून टाकून तिला मोकळें करावयाचा त्याचा कृतनिश्चय होता.

" पुरुषी वृत्तीचा एक मजेदार मासला मी उद्यां तुम्हांला दाखविणार आहें, " शैला बोलतां बोलतां म्हणाली.

" हो का ? " दचकूनच हलधरनें विचारलें.

शैला मनमोकळी, तशीच भाबडी होती. आपल्या बोलण्याचा अर्थ आपणाला जो अभिप्रेत आहे त्याच्याहून दुसरा एखादा निघण्याची शक्याशक्यता आहे कीं काय याचा विचार ती करीत नसे. पण हलधरचें मन आतांशा बरेंच हळवें झालें होतें. पुरुषजातीवर शैला टीका करूं लागली, कीं त्यांतील प्रत्येक शब्द तो पारखून पाही.

त्यांतील एखादा शेरा आपल्याला उद्देशून तर तिनें उच्चारला नसेल ना असें त्याला वाटत राही.

" बघा तर खरी मजा, हं ! हें वाचून बघा ! " असें म्हणून तिनें एक पत्र हलधरच्या हातांत वाचण्यासाठीं दिलें.

हलधरच्या मनांत तें प्रथम हातांत घ्यायचेंच नव्हतें. पण आपला रुसवा व्यक्त करावयाचा आजचा प्रसंग नव्हे, असा विचार करून त्यानें तें पत्र चटकन् वाचून टाकलें. पण त्याचें त्याला विशेषसें कांहीं वाटलें नाहीं. त्यानें निर्विकार चेहऱ्यानें तें पुन्हा शैलेला दिलें.

" कसं वाटलं हें पत्र वाचून ? "

" कांहीं नाहीं. प्रो. लंवगे माझी शेतीबागायती वगैरे पाहायाला येणार आहेत ना उद्यां ? असे पुष्कळ लोक येतात, त्यांत विशेष तें काय ? त्यांतलेच हे एक. "

हलधरनें असें उत्तर दिलें खरें, पण त्याला शेखरच्या तोंडून ऐकलेल्या नांवांची आठवण झाली. प्रो. लंवगे यांचें नांव त्यानें इतरही कांहीं कॉलेज विद्यार्थ्यांच्या तोंडून ऐकलें होतें. ते एक पोरसवदा, लुब्रे व फटकळ गृहस्थ आहेत असा त्यांचा लौकिक होता साऱ्या कॉलेजविश्वांत. पण हलधर नकळतेपणावर घालूनच बोलत होता.

" मागची थोडी हकिगत सांगतें तुम्हांला. वर्गांत प्रोफेसर येऊन बसल्याशिवाय तर आम्ही मुली जात नाहीं आंत ? प्रोफेसर लंवगे यांचा तास होता. येऊन बसल्याबरोबर हातरुमाल तोंडावरून फिरविण्याची सवयच आहे त्यांना. त्यांचा हातरुमाल टेबलाच्या खुराजवळच पडला होता. आम्ही तिघी मुली चाललों होतों वर्गांत. मी सर्वांच्या मागें होतें. पुढच्या दोघीजणी तो ओलांडून किंवा पायांखालीं तुडवूनच गेल्या. मला त्यांचं तें कृत्य नीट वाटलं नाहीं... "

" कारण वागणुकीचे ते नियम लक्षांत असतील तुमच्या... ' चांगली वर्तणूक हेंच खरें शिफारसपत्र ' या धड्यांतील ! "

तिनें त्याच्याकडे, विशेषतः त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पाहिलें. तिला एकेरी नांवानें जो तो अलीकडे संबोधीत होता, ती पद्धत सोडून त्यानें आतांच तिला ' तुमच्या ' असें बहुवचनानें संबोधिलें होतें. तिच्या तें तेव्हांच लक्षांत आलें असावें. पण तिला आपली हकिगत पुरी करावयाची होती. म्हणून ती बोलतच राहिली.

" मी तो हातरुमाल उचलून टेबलावर ठेवण्याकरतां म्हणून वर उचलणार तोंच तो प्रोफेसरमहाशयांनीं उचलून घेतला आणि वर्गांत टाळ्यांचा कडकडाट झाला. माझ्या आंगाचा जळफळाट झाला.

" त्या दिवसापासून प्रोफेसरसाहेब माझ्याशीं थोडासा लघळपणा करूं लागले. माझ्या मैत्रिणी मला खूप बोलल्या. "

" कां ? त्यांना पाहिजे असलेलं प्रोफेसरसाहेबांचं प्रेम तुम्हांला लाभलं म्हणून ? " हलधरनें खोचीनेंच विचारलें आणि मागाहून जीभ चावली. पण ओष्ठधनुष्यांतील जिव्हेच्या बैठकीवरून सुटलेला शब्दबाण थोडाच मागें परतणार ?

" हें पहा बाळासाहेब ! " शैला म्हणाली, " मी बाष्कळपणाचे प्रेमाचे चाळे खेळत राहाणारी मुलगी नव्हे. प्रोफेसरसाहेबांच्या प्रणयलीलांना मी भुकेलेली नव्हतें. माझ्या मैत्रिणींपैकीं तशी कुणी असली तर मला त्याची माहिती देखील नव्हती. "

" तर मग त्या कां बोलल्या तुम्हांला ? "

' त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ असा होता, कीं आपण मुलींनीं असली सभ्यता कधींही सांभाळण्याच्या भरीस पडूं नये. कारण आपण सभ्यतेकडे पाहून शिष्टाचाराचे नियम सांभाळायला गेलों, तर हे उल्लू पुरुष त्या कृतींचा आपल्याला हवा तसा निराळाच अर्थ लावतात आणि आपणां मुलींना त्रास देत राहातात. "

" अस्सं ! "

" हो तर ! त्यासाठींच त्यांनीं तो हातरुमाल उचलला नव्हता, असं त्या म्हणाल्या. "

" पण मला पुरुषांच्या तर्फे तुम्हांला एक प्रश्न विचारायचा आहे... "

" विचारा ना ! "

बोलत असतांच तीं दोघें उसाच्या मळ्यांत शिरून फिरत होतीं. एके जागीं दोन सपाटसे दगड बघून तीं दोघें बसलीं. शैला वादविवादाच्या ईर्षेंत आली होती. हलधरच्या हेलकावे खाणाऱ्या मनाला गुंतागुंतीचा एखादा धागा उकलतो कीं काय तें पाहावयाचें होतें.

" मला असं विचारायचंय्, कीं स्त्रियांच्या या कृतींचा पुरुषांनीं निराळ्या तऱ्हेनें अर्थ लावला तर प्रथम स्त्रियांनीं त्यांच्याकडे क्षमाशील दृष्टीनें अगर फार तर उपक्षेनेंच पाहावं. "

" पण कां म्हणून तें ? "

" एखादीच्या — आपण तिच्या असंच म्हणूं — तिच्या हातून जी विशिष्ट प्रकारची वर्तणूक झाली आहे, ती भावाविष्करण करण्यासाठीं सहेतुक झाली आहे, कीं सहजासहजीं झाली आहे, हें समजून घ्यायला अवधि नको का त्याला थोडा तरी? कारण..."

यावर शैला उत्तर देऊं पाहात होती.

" थांबा, " तिला थोपवून हलधर बोलूं लागला, " माझं म्हणणं आधीं तुम्हांला नीट सांगतों. त्यानें तिची कृति जर सहेतुकपणाची म्हणून घेतली तर त्याला ती उथ्रा म्हणणार आणि निर्हेतुकपणाची म्हणून उपक्षेनें वागूं लागला, तर ती त्याला नीरस, नेभळट म्हणणार. अशा स्थितींत त्या बिचाऱ्या पुरुषानें वागावं तरी कसं? "

शैला मोठ्यानें हसली.

" डायलेमाच आहे हा! " हलधर आणखी हसत म्हणाला.

" तिच्या प्रेमाचा मागमूस लावणं हें एक मोठं गहनगूढच आहे पुरुषाला! " हलधर थोड्या वेळानें म्हणाला.

शैला उसाच्या एका पातीशीं खेळत बसली होती. जणूं काय ती तत्त्वाचिंतनांत निमग्न झाली होती. शेवटीं तें तत्त्व तिच्या हातीं लागलें असावें.

" स्त्रीप्रेम हें गहनगूढ असो कीं नसो, पण समाजांत पुरुषांच्या प्रणयलीलांना स्त्रीच बळी पडत असते हें उघड सत्य कुणालाही नाकबूल करतां यायचं नाहीं. " तिच्या भ्रुकुटीचीं मूलाग्रें त्रुटित झालीं होतीं आणि बोलत असतां डाव्यापेक्षां उजवा डोळा किंचित् अधिक विस्फारित झाला होता. ती विचारमग्नता दाखविणारी नयनलीला हलधरला खरोखरच नयनमनोहर भासली. " यासाठीं एखाद्या स्त्री-पुरुषाचा वाईट संबंध असल्याची वार्ता ऐकली असतां, तिच्या सत्यतेविषयीं विश्वसनीय आधार सापडेपर्यंत ती निराधार धरून चाललं पाहिजे माणसानें. पण असल्या गोष्टी ऐकल्या-बरोबर असत्य मानण्यापेक्षां सत्य मानण्याकडेच समाजाची प्रवृत्ति अधिक. या प्रवृत्तीमुळें स्त्रीजातीला आजपर्यंत फार अन्याय होत आला आहे. "

बोलणें संपतांक्षणींच तिनें अकस्मात् हलधरकडे पाहिलें, तों हलधर ओशाळला. कारण शैला आपल्याशींच खेळत असल्यामुळें ती अचानकपणें वर बघायची नाहीं अशा कल्पनेनें निःशंकपणें शैलाची कपोलशोभा पाहाण्यांत तो गढला होता. तोंडाच्या

जिवणीच्या दोन्ही बाजूंस किंचित् खोलगट भागांच्या सौंदर्यानें त्याची दृष्टि आकृष्ट केली होती. त्या खोलगटपणाला खळ्या असें म्हणतां आलें नसतें.

" कांहीं असो, " आपण चालू विषय लक्षपूर्वक ऐकत आहोंत असें दर्शविण्याकरितां हलधर अवधान धरून म्हणाला, " हातरुमाल उचलण्याच्या कृतीनें उत्तेजित झाल्यामुळें प्रो. लंवगे यांनीं जर थोडंसं पुढें पाऊल टाकलं तर मी तरी तें क्षम्य समजेन. तें कांहीं महापातक गणलं जाणार नाहीं. "

" पण त्यानंतर माझ्याकडून त्यांना उत्तेजन मिळालं असलं तर ना ? हातरुमालाचा प्रसंग हा सहजीं घडून आलेला. त्यानंतर मी त्यांना टाळीत आल्यें असतां त्यांनीं उत्तेजित व्हावंच कां मुळीं ? सारा लुब्रेपणा या पोरसवद्या प्रोफेसरांचा ! "

" प्रो. लंवग्यांना पोरसवदे प्रोफेसर म्हणायला तुम्ही काय अशा आजीबाई आहांत ? "

" खरं बोलायला भीति कोणाची ? त्या ठिकाणीं लिंग नि वय कशाला बघायचं ? आतां उद्यां बघा तर खरी कशी गंमत करत्यें दिवसाचे चोवीस तास दांतांनीं लवंग कुरतडीत बसणाऱ्या त्या प्रोफेसरमहाशयांची ! "

' गंमत ' या शब्दाच्या उच्चाराबरोबर शैलानें मानेला असा कांहीं गमतीचा हिसडा दिला, कीं तो पाहून स्त्रियांच्या साहाजिक होणाऱ्या हालचाली पाहाण्यांत देखील मोठी गंमत असते असा नवीनच स्वानुभवाचा ग्रह हलधरच्या मनाचा झाल्यास त्यांत नवल नाहीं.

पण त्या दिसल्याबरोबर उसाचीं तीं सूक्ष्म कुसळें असलेली खरखरीत पात तिच्या गालाला किंचित् लागली.

" अय्या ! " शैला ओरडली.

हलधरनें खिशांतला हातरुमाल काढून शैलाच्या गालावरील ओरखडलेला भाग हलकेच चोळला.

तितक्यांतच बुट्टोजी हलधरला शोधीत तेथें आला.

" काय बुट्टोजी ? " हलधरनें विचारलें.

" घराकडे कोणी पाव्हणे आले आहेत. " बुट्टोजी बोलला खरा, पण तो मागच्या पावलींच मागें परतूं लागला. त्याची डोळेमिचकावणी सुरू झाली. आपला हातरुमाल काढून त्यानेंही आपल्या तोंडावर धरला.

" कोण पाव्हणे ? " हलधरनें उत्सुकतेनें विचारलें. त्याला वाटलें, समितींतील मंडळी तर कोणी कळविलेल्या दिवसाआधींच आलीं नसतील ना ?

" ते...ते प्रोपेछर ! अं...प्रोपेछर लंवगे ! "

" प्रोफेसर लंवगे ? म्हणजे ? " शैलानें पत्राचा लिफाफा पाहिला. पत्र मध्येंच एक दिवस पडून राहिलें होतें. तें आधल्या दिवशीं मिळालें पाहिजे होतें.

" केव्हांसे आले ? काय म्हणताहेत ते ? " हलधरनें विचारलें.

" ते आलेत आपलं फार्म पाह्यला नि आपणां दोघांना भेटायला. त्यांनीं वर्तमानपत्रांत बरंचछं वाचलंय म्हणे आपल्याबद्दल. "

" मला देखील भेटायला ? छे ! माझा त्यांचा परिचय नाहीं. ह्या जातील आपल्या गुरुदेवतेला भेटायला ! " हलधरनें म्हटलें.

" हो जातेंच मी आधीं गुरुमाउलीची पूजा बांधायला ! तुम्ही माझ्याबरोबर याल तर बरं होईल. नाहीं आलांत, म्हणजे मागाहून आलांत, तरी चालेल. मला मात्र गेलंच पाहिजे लवकर. "

शैला खरोखरच बाणासारखी निघाली.

" बुट्टोजी येतोयच पाठोपाठ. " हलधर म्हणाला.

" लवकरच येऊं द्या त्याला. मला गरज लागेल त्याची कदाचित्. गडीमाणसं आहेत ना जवळपास ? "

" आहेत ना छगळीं. " बुट्टोजी म्हणाला.

हलधरचा पोषाख आज कॉलेजांतल्या तरुणासारखा होता. चारदोन पावलें जातांच शैला दृष्टिआड झाली. बुट्टोजी हलधरच्या जवळ आला. त्यानें आजूबाजूला पाहिलें. तो हलक्या आवाजांत बोलूं लागला.

" धाक्या आला आहे गांवांत ! "

" कधीं ? " हलधरनें निश्चलतेनें विचारलें.

" कालच. "

" मग ? " हलधरची निश्चलता पाहून बुट्टोजीच्या मनावर त्याच्या खंबीरपणाचा विलक्षण परिणाम झाला. कारण धाकजी हलधरला आपला हाडवैरी समजत असे. संपवाल्या शेतकऱ्यांचा तोच पुढारी होता. दीर्घद्वेष आणि स्वाभिमान धाकजीच्या रोमरोमांत भरून राहिलेला होता.

" तो जिवावर उठला आहे आतां. "

" कुणाच्या ? "

" स्वतःच्या. "

" अरेरे ! "

" पण आधीं तुमच्या नि तें साध्य झालं नाहीं तर स्वतःच्या. "

" माझ्या ? हरकत नाहीं. कदाचित् मीच माझा स्वतःचा..."

हलधरनें पश्चात्तापानें आपली जीभ चावली. बोलावयास नको असलेले शब्द नकळत आपल्या मुखांतून उद्वेगाच्या भरांत बाहेर पडत होते असें हलधरला वाटलें. ते शब्द उच्चारतांना हुतात्मा होऊं इच्छिणाराची जशी मुद्रा व्हावी तशी आपल्या आवडत्या धन्याची — बाळासाहेबांची — झालेली पाहून बुट्टोजीच्या काळजांत पाण्याचा बांध एकदम कोसळावा तसें कांहींतरी खळबळलें.

" काय ? स्वतःचा काय ? " त्यानें डोळे विस्फारित करून घाबऱ्या मुद्रेनें विचारलें.

" अरे असं काय करतोस घाबरटासारखं बुट्टोजी ? " हलधर सावधानतेनें सावरून घेऊन शांतपणें म्हणाला, " मीच माझा स्वतःचा बचाव करायला खंबीर आहे. पण त्याच्या बायकोला दररोज जेवण जातं ना आपल्याकडून ? "

" त्याची बायको मरायला टेकली आहे उपाछांनीं. "

" जेवण जात असतां ? "

" जेवण ती फक्त आपल्या मुलाला घालीत अछे. "

" आणि स्वतः ? "

" मोलमजुरी मिळाली तरच ती जेवी. ती आमच्याकडचं जेवण घेत नछे. "

" अस्सं ? "

" हो. आणि धाकजी आल्यापाछून मुलाचंही जेवण बंद, म्हणजे छगल्यांचंच जेवण बंद. धाकजी दारू पिऊन टेर अछतो, आणि घरांत दोन जीव उपाछीं ! "

" काय हा हेकटपणा ! शेतकऱ्यांचं हित शेतकऱ्यांना कधीं समजूं लागणार ?" आकाशाकडे पाहात हलधरनें म्हटलें.

" बरं, पाहुणे परवां येतील. सगळी तयारी आहे ना ? "

" हो. "

" ऊस तोडायला झाला नाहीं का हा ? " उसाकडे पाहात हलधरनं विचारलें.

" अजून महिना पंधरा दिवस गेले तरी हरकत नाहीं. "

" रगाडा..."

" हो रगाडा घातला कालच. "

" बरं तर, तूं जा घराकडेच. प्रो. लंत्रगे आले आहेत ना पाहुणे ?"

" पात्रच आहे तें एक !"

" कसं ? "

" नाचरे आणि थिल्लर दिछतात. ते काय कालेजांतले प्रोफेछर ?"

" तुला नवल कसलं वाटलं ? "

" दिछतात तर एवढेछेच. "

" वाः ! विद्वत्ता वयावर अवलंबून असत नाहीं. लहान वयांत प्रोफेसर पदवीला पोचलेला माणूस अधिक आदरणीय झाला पाहिजे आपल्या दृष्टीनें. अत्यंत हुषारी आणि गाढी विद्वत्ता असल्याशिवाय कोणी चढत नसतो वर इतक्या पदवीला. दुसऱ्याच्या ठिकाणचे गुण घ्यावेत आपण नेहमीं जगांत. सारं दिसतं तसं नसतं...."

" नुछत्या वछिल्याच्या जोरावर झालेले प्रोफेछर मला ठाऊक आहेत. हा तर हायछ्कुलांतला मुलगाच दिछतो !"

" बरं जाऊं दे. तूं इतका बुटका दिसतोस, म्हणून काय तुला पंधरा वर्षांचा मुलगा म्हणतां येईल ? "

बुट्टोजी गप्प राहिला.

" मी घरीं गुपचूप जाऊन बाजूला बछतों आणि त्या पाहुण्याची गंमत बघतों. "

" बरं गुपचुप बस आणि मग मला सांग काय बघितलंस तें सगळं, हं. बहुतकरून पाहुण्याची रवानगी आजच्या आजच होईल. "

बुट्टोजी घरीं जावयास निघाला.

" आज तुम्ही पोछाख जवळ जवळ त्या प्रोफेछराछारखाच केला आहे. फक्त मिछा छाटलेल्या नाहींत त्याच्या छारख्या आणि छिगारेट नाहीं तोंडांत तुमच्या !"

" अरे ! किती वटवट लावशील ? "

" तिकडे कुठे ? धाकजीच्या घराच्या बाजूछ जाऊं नका हं !"

" चूप !"

बुट्टोजी निमूटपणें गेला.

हलधरचे पाय धाकजीच्या घराच्या बाजूस वळले.



प्रकरण नववें

## प्राध्यापकांना पाहुणचार !

काळोख पडूं लागला होता. हलधर सर्व संधानें मनांत घोळवीत आडवाटेनें चालला होता. त्याला गाडीरस्त्याला मिळायला जायचें होतें. आपल्या घराकडच्या वाटेकडे मागें मागें बघीत तो आस्ते आस्ते चालला होता.

शैलाला खूष करण्याची त्याची युक्ति आज सफल व्हावयाची होती. ती सफल व्हावी अशी त्याची आत्यंतिक मनीषा होती. शैलाला प्रिय असलेली वस्तु तिला कधीं एकदा देतों असें त्याला झालें होतें.

कांहीं वेळानें तो आडवाट सोडून गाडीरस्त्याला जाऊन मिळाला. त्यानें चारी बाजूंस पाहिलें. शेवटीं तो रस्त्याच्या कडेला कांहीं वेळ बसला. तेथून कांहीं अंतरावर त्या गांवचें दारूदुकान होतें. तेथें पुष्कळ माणसें मोठमाठ्यानें बोलत असल्याचा गलबला त्याच्या कानीं आला. पण तिकडे त्यानें लक्षच दिलें नाहीं. तो आज आपल्या विचारांत गुंग झाला होता.

इतक्यांत त्याचेंच नांव कोणींतरी उच्चारलें. तेव्हां मात्र त्याचे कान तिकडे वेधले.

रस्त्याच्या बाजूला काजूच्या झाडाखालीं एक मोठा खडक होता. त्याच्यावर तो बसला आणि लक्षपूर्वक ऐकूं लागला.

" बाळासाहेब पक्का दगलबाज माणूस हाय. "

पुढचें बोलणें हलधरला नीट ऐकूं येईना. पण तो आवाज त्यानें ओळखला. धाकजीचाच तो आवाज. धाकजी दारू पीत असतांच आपल्या दारूदोस्तांबरोबर बोलत असावा.

" बाळासाहेबाइतका भला माणूस दुनियेंत मिळायचा नाय असं सगळेजण बोलतात. " दुसरा कोणी बोलला.

" अरे जा ! बाळासायबासारा बदमाश, पाजी, हरामखोर दुनियेंत बी नाय ! माझ्या घरादारावर वरवंटा फिरवला त्यानं. "

" शाबास, अरे इचार कर बोलतांना धाक्या ! नरकांत पडशील पाप्या ! तुज्या

बायकोपोराला पोसतो, त्याचा हा असा उपकार फेडतोस ? त्याला नुकसानींत आणायला ऐन वेळीं संप करून जमिनी पाडल्यास; त्या सगळ्यांचा म्होरका तूं, तर तुजं नुकसान करायचं सोडून तुज्या मानसानूला तो पोसतो. त्याला तूं बदमाश म्हनतोस ! अरं कुठें ठेवशील हें पाप ! " कोणीं एकानें हटकलें.

" अरे कोन रे बोलतोय तो ? अरे हे बांबुर्डे आमाला भिकेला लावतात. अरे ! तूं कोन बोलतोस तो बांबुर्ड्यांच्या बीजाचा तर न्हाईस ? माज्या बायकोपोराला पोसतो ! अरे तो तसं करतो म्हणूनच माज्या आंगाचा निखारा होतो. माजी बायल गोरीगोमटी, भरली त्याच्या डोळ्यांत. माज्या बायलेला जेवण पोचवण्याची त्याला काय गरज ? आणि ह्या ××× तरी त्याचं जेवण ध्यावं कशाला ? साराच घोटाळा साला ! आदि त्याला आनि मग हिला – दोगानूला बी पोचवतो – अन मग..."

" अरे कोनाला म्हन्तोस बांबुर्ड्यांच्या बीजाचा ? धाकज्या ! अरे समद्या गांवाचं कल्यान केलान्, त्या देवमानसाला तूं शिवीगाळ करतोस ? "

" अरे साल्या..." धाक्या गरजला आणि तेथें लहानशा मारामारीला सुरुवात झाली. इतक्यांत सायकल येत असलेली हलधरला दिसली. त्यानें आपल्या टॉर्चचा प्रकाश फेकला. सायकलवाला उमगला. सायकल थांबली.

हलधर रस्त्यावर आला. त्यानें सायकल आणणाऱ्या माणसाला कांहींतरी सांगितलें. तेव्हां तो इसम मागें वळून आल्या वाटेनें घराकडे जाऊं लागला. हलधर सायकलवर बसून पुढें भरधाव निघाला.

इकडे शैला घरीं गेली ती मागच्या दारानेंच आंत शिरली. तोंपर्यंत प्रोफेसरसाहेब बाहेरच्या ओट्यावरील एका वेताच्या खुर्चीवरच बसले होते. अमेरिका व इंग्लंडमधील शेतकीविषयक एक दोन मासिकांचे ताजे अंक त्या दिवशींच्या टपालानें आलेले तेथें पडले होते. ते चाळीत वेळ घालवण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

शैलानें घरांतून डोकावून पाहिलें व आपण आल्याची तिनें पाहुण्यांना चाहूल लागूं दिली नाहीं. ती बुट्टोजीची वाट बघत राहिली होती. थोड्या वेळानें बुट्टोजी आल्यावर दिवाणखान्याच्या डाव्या बाजूकडील खोलींत तिनें त्याला लपून बसायला सांगितलें. नंतर बाहेरून खोलीचें दार ओढून घेऊन ती पुन्हा मागील दारीं गेली. तिनें एका गड्याला बोलावून आणलें व त्याला बराच वेळ कांहीं सांगितलें.

तो गडी कोंकणी असला तरी हलधर व शैला यांच्या संगतींत असे. त्यामुळें शुद्ध भाषेचे कांहीं शब्द त्याला वापरतां येत असत. मोठ्या पाहुण्यांबरोबर बोलावयाचें आहे हें ओळखून तो शक्य तितक्या शुद्ध भाषेंत बोलण्याचा प्रयत्न करीत होता.

हा गडी म्हणजे एक बारीक, उंचेलासा, किडकिडीत माणूस होता. घरांत दिवाबत्ती लावणें, पाहुण्यांची सरबराई ठेवणें, गुरांच्या गोठ्यावर लक्ष ठेवणें, वगैरे कामें तो बघत-असे. उजव्या पायावरील मळक्या धोतराचा भाग डाव्या पायावरील धोतराच्या भागांत गुंडाळून तें डावीकडे वर खोवलेलें होतें. आंगांत त्यानें हातकडें घातलेलें होतें. डोकीला पुढच्या बाजूस केस धरलेले व मागच्या बाजूस शेंडी वाढविलेली आणि त्यावर खोबऱ्याचें तेल घातलेलें होतें. अस्सल कोंकणी खेडुताचा तो नमुना होता.

मागील दाराकडून बाहेरूनच तो पुढील दारांत आला.

" काय पाव्हण्यांनु ! खंय गेल्यात ? " त्यानें प्रोफेसरसाहेबांस पायऱ्या चढत असतांच विचारलें.

पाहुण्यांनीं त्याच्याकडे उपेक्षेनें पाहून पुन्हा पुस्तकांत मान घातली.

शैलाच्या घरीं आपणांला मिळणाऱ्या स्वागताची प्रोफेसरसाहेबांची कल्पना कांहीं निराळीच होती. कोंकणी लोकांच्या कोंकणेपणावर प्रोफेसरसाहेब मनांत चरफडत होते.

" कोन पायजे तुमांश मास्तरांनु ? " गड्यानें पुन्हा पाहुण्यांना बोलते करण्या-करितां विचारलें.

खेडेगांवांत मास्तर म्हणजेच मोठा माणूस. पाहुण्यांना मोठेपणा देण्याकरितां म्हणून गड्यानें जो हा प्रयत्न केला, त्याचा उलटच परिणाम पाहुण्यांवर झाला.

आजूबाजूस कोणी नाहींसें पाहून पाहुणे म्हणाले,

" आम्ही प्रोफेसर असतों कॉलेजांत. तुझे धनी कुठें आहेत ? "

पाहुण्यांचा तो ऐटबाज पोषाख, बूट, नेकटाय, जवळच ठेवलेली हॅट्, बाहेर उभी केलेली सायकल गड्यानें पाहिली होती. आतांचें ठसकेबाज आणि नेटाचें उत्तर ऐकून आणि दोनदां बोलल्याशिवाय ज्या अर्थीं उत्तर मिळत नाहीं, त्या अर्थीं पाहुण्यांस कमी ऐकूं येत असावें असें समजून गडी देखील जरा मोठ्यानेंच बोलूं लागला.

" कित्या ? आमच्या धनयांची ओळख हाय ? "

" धन्यांची नाहीं, पण धनिणींची आहे. आल्या का त्या बाहेरून ? "

" कितीसो येळ जालो येवन तुमकां ? "

प्रोफेसरसाहेबांनीं तिरस्कारानें भृकुटी चढवलेल्या त्यांच्या चष्म्यांतून गड्याला दिसल्या.

" तुमकां तरास लय जालोसो दिसता. तान लागली ? " गड्यानें विचारलें.

" तो बुटका माणूस कुठें गेला ? तो चहा आणतों म्हणाला होता. " पाहुण्यांनीं एक थाप ठेवून दिली. कारण त्यांना चहा पिण्याची तलफ आली होती.

" हां. वयनीसायब आसत हां. त्यांका सांगतों मियां. " असें म्हणून गडी घरांत गेला. घरांतून शैला ऐकतच होती हा संवाद. खोलींत बुट्टेजीला हसूं येत होतें.

आंतील दिवाणखान्याच्या मध्यभागीं एक गोलमेज होतें त्यावर एका बशींतून कोंकणांत पिकलेल्या गुळाचा खडा व एका स्वच्छ, चकचकीत पितळेच्या पेल्यांतून गार पाणी आणून गड्यानें ठेवलें. नंतर त्यानें एका सुंदर गडव्यांतून पाणी बाहेर नेलें आणि पाहुणे बसले होते, त्या खुर्चीच्या खुराजवळ नेऊन ठेवलें.

" हां, ह्यां पाणी घ्या आनि हातपाय धुया. " त्या. गड्यानें म्हटलें.

प्रोफेसरसाहेबांनीं अत्यंत तिरस्कारानें त्या गड्याकडे पाहिलें. त्याच्या थोबाडींत मारण्याकरितां त्यांचे हात चळवळ करूं लागले.

" आयकुंक कमी येतासा दिसतां. खोबऱ्याचां त्याल घालुंक होयां वांयच् कानांत. " तो गडी अर्धवट स्वतःशींच पण खरें म्हटलें तर पाहुण्यांना उद्देशून म्हणत होता.

प्रोफेसरांचा बाहेरून दाखवण्याचा हेतु शेतवाडी पाहाण्याचा होता. हलधरची कीर्ति वर्तमानपत्रांतून सर्वतोमुखीं झाल्यामुळें व शेतीचे प्रयोग पाहाण्याकडे हल्लीं लोकांचें लक्ष वेधूं लागल्यामुळें अनेक अनोळखी माणसें देखील हलधरकडे येत असत. प्रोफेसर लंवगे हे प्रथम ज्या उत्साहानें आले होते, तो उत्साह येथें येऊन बसल्यापासून ओसरूं लागला होता. तथापि त्यांना तसें हातपाय गाळण्याचें कारण नव्हतें. कारण हलधरची शेतवाडी पाहाणें हा एक सार्वत्रिक औत्सुक्याचा विषय होता.

प्रोफेसर लंवगे मोठ्या ऐटींत बूट खडखडावीत दिवाणखान्यांतल्या गोलमेजा-भोवतालच्या खुर्च्यांपैकीं एकीवर येऊन बसले. त्यांनीं प्यायच्या पाण्याचा पेला घेऊन

बाहेर जाऊन चूळ भरून टाकली व हातरुमालानें तोंड पुसलें. त्याबरोबर सेंटचा घमघमाट चोहींकडे पसरला.

प्रोफेसर लंवगे खुर्चीवर न बसतां दिवाणखान्यांतील भिंतीवर लटकावलेलीं चित्रें आणि तसबिरी पाहात होते. त्यांत निसर्गातील देखावेच अधिक होते. हलधरचे एक दोन फोटोही होते. पण त्यांत शैलाचा फोटो एकही नव्हता.

" कसं काय प्रोफेसरसाहेब ? "

हा स्वागतार्थी प्रकार मंजुळ आवाजांत मिश्रित झालेला असला तरी तो बरोबरीच्या प्रोफेसर मित्रानें उच्चारल्यासारखा पाहुण्यांच्या कानास लागला. म्हणून त्यांतील उत्तेजकपणा अजिबात नष्ट झालेला होता.

" कुणीकडे वाट चुकलांत आज ? "

हें तर अगदीं लंगोटीमित्रानेंच बोलल्यासारखें झालें.

कोंकणच्या उन्हाळ्यांत गरम पाण्याचें स्नान करणें भाग पडलें असतां जसें वाटतें, तसेंच पाहुण्यांस वाटलें.

" या बसा ना ! गूळपाणी घेतलंत का ? " शैलाच आपल्या प्रोफेसर लंवग्यांचें स्वागत करण्यासाठीं येऊन बोलत होती. ती आली आणि एका खुर्चीवर बसली.

या पहिल्याच फेरींत पाहुणे जरासे चीत झाले. शैला येऊन बसल्यानंतर प्रोफेसर-साहेबांना दुसऱ्या खुर्चीवर बसणें भागच होतें.

" आलों होतों मुंबईला युनिव्हर्सिटींत कांहीं कामासाठीं. यंदा मॅट्रिकच्या परीक्षेला एक्झामिनर्शिप पत्करण्याबद्दल आमंत्रण आलं होतं. मी तें कबूल केलं आहे काल. तिथून काल आलों होतों एका स्नेह्याकडे कोचऱ्याला. म्हटलं जावं बघून फार्म वगैरे तुमचं जातां जातां. "

" अस्सं—अस्सं ! पण फार्म पाहायला इतकी सांज करून येतां नये होतं..." शैला सहज म्हणाली. पण त्या बोलण्यांत दुसऱ्या दिवशीं न राहाण्याची सूचना गर्भित आहे असें पाहुण्यांस वाटलें. " सायकलवरून आलांत ? "

" हो. मि. कुळकर्णी बाहेर गेले आहेत वाटतं ? "

" त्यांचीं कामंच फार. "

" साहजिक आहे, व्याप काय थोडा थोडका आहे ? पण तुम्हीं कां कॉलेज सोडलंत ? "

" माझ्यावरचा एकेक प्रसंग...तो काय सांगायचा म्हणा. मग मनाला कांहीं तरी व्यवसाय पाहिजे म्हणून या असल्या शेतीबागायतीच्या कामांत लक्ष घातलं..."

" कॉलेजांत राहून बॉटनी–झूऑलजीचा कोर्स घेतला असतात, तर तो व्यवसाय मनाला कॉलेजांतही राहून मिळण्यासारखा होता. इच्छा असेल तर अजूनही..." प्रोफेसरसाहेब आपल्या भाषणाचा परिणाम कसा काय होत आहे तें पडताळण्यासाठीं शैलाच्या तोंडाकडे पाहूं लागले.

" पण हलधरपंत..."

" बाळासाहेब म्हणतात त्यांना. " शैलानें सुधारणा सुचविली.

" बाळासाहेबांचीं मतं मागासलेलीं नसतील असं वाटतं. तुम्हांला आमच्या कॉलेजांत पुन्हा यायला कांहीं..."

" तुमच्याच कॉलेजांत ना ? " खालचा ओठ चावीत अगदीं प्रोफेसरसाहेबांच्या डोळ्यांकडे पाहात शैलानें विचारलें.

प्रोफेसरसाहेब खट्टू झाले. त्यांच्यानें शैलाकडे सरळ पाहावेना. खालीं मान घालून वर्तमानपत्राच्या घडीकडे पाहात व नंतर बाहेरच्या बगीच्याकडे अहेतुकपणें पाहात ते बोलूं लागले,

" कुणालाही आपल्या कॉलेजचा अभिमान असायचाच. मलाच कां ? तो तुम्हांलाही असेल असं मला वाटतं..." प्रोफेसरसाहेबांनीं आंगावर आलेली बाजू उत्तमच सावरली इतकेंच नव्हे, तर शैलालाच उलट पकडीनें धरल्यासारखें झालें.

शैला क्षणभरच गोंधळल्यासारखी झाली. पण लगेच तिनें म्हटलें,

" कित्येकांचा स्वाभिमान बहिःसारी असतो, तर कित्येकांचा अंतर्वर्ती. आपला प्रांत म्हटला, कीं मग आपलं कॉलेज, म्हणतां म्हणतां आपलाच वर्ग आणि मग शेवटीं आपणच चांगले असंही कित्येक प्रोफेसरांस वाटत असेल. "

शैला थोडीशी थांबली. प्रोफेसरांवर केलेला वार एकदम फार खोल जाऊं नये म्हणून विषय बदलण्याच्या इराद्यानें ती म्हणाली,

" गूळपाणी नाहीं घेतलंत आमचं कोंकणी लोकांचं ? "

" पाणी नाहींच इथें."

" प्यायला ठेवलेलं पाणी हात धुवायला घेतलं असेल तुम्ही. आमच्या कोंकणांत हाच चहा. खरं म्हटलं तर आमचा चहा म्हणजे पेज. पण ती सकाळची. पेजेची वेळ तुम्ही चुकवलीत. संध्याकाळच्या पाव्हण्याला गूळपाणी द्यायची जुनी पद्धत आम्ही पुन्हा रूढ केली आहे. चहानें खेड्यांचं आरोग्य पोखरून टाकलंय अगदीं. "

प्रोफेसरसाहेब रुमालानें तोंड पुसून मग त्याच रुमालानें वारा घेऊं लागले. सेंट्चा वास घमकन् आला.

" चहानें आपणां सर्वांनाच ग्रासून टाकलं आहे. पण सामुदायिकपणानें सोडल्याशिवाय तो बंद व्हायचा नाहीं. " प्रोफेसर म्हणाले.

" हो. नाहींतर पाव्हण्यांना वाटतं ना, कीं आपल्याला चहा मिळाला नाहीं तर आपलं आदरातिथ्य झालंच नाहीं असं ! "

एकेक गोळी प्रोफेसर लंवग्यांच्या काळजाला भेदून चालली होती. खिशांतली एक लवंग काढून प्रोफेसरसाहेब कुरतडूं लागले होते.

" बाकी चहाबरोबरच ही परदेशी सेंटची आयात देखील बंद होईल तर केवढी तरी आपत्ती दूर होईल. गरीब शेतकऱ्यांना घरांत रात्रीं दिव्याला तेल मिळत नाहीं म्हणून रात्रीचं जेवण असलंच, तर तें काळोखांत किंवा सायंकाळीं दिवसाउजेडीं उरकून घ्यावं लागतं. आपले विलासी श्रीमंत लोक अत्तरांचे दिवे जाळतात, तर आपला जमाखर्च न पाहातां पोकळ दिमाख मिरवणारे मध्यमवर्गांतले लोक सेंटसारख्या चैनीच्या वस्तूच्या पायीं पैसा परदेशीं घालवतात. तुम्हांला ठाऊक नसेल प्रोफेसर लंवगे – सॉरी हं – प्रोफेसर लोंढे, कीं कोंकणातले गरीब लोक काजूच्या बियांच्या जाड टरफलांतून एक प्रकारचं तेल काढतात आणि तें देखील दिव्याला वापरतात.

" अरेरे ! " कांहींतरी उद्गार काढणें भागच होतें म्हणून प्रोफेसरसोहब उद्गारले !

" अरेरे म्हणायला नको. तसं करीत होते तोंपर्यंतच ते सुखी होते. पण केरोसीन वापरूं लागल्यानंतर पैशाला महाग झाले. "

बुट्टोजी बारीक फटींतून पाहात होता. शैला थेट अगदीं कॉलेजगर्लसारखी वागत आणि बोलत होती. कॉलेजांत आपल्या मैत्रिणींबरोबर ती कशी वादविवाद करीत असेल, त्याची कल्पना यावेळीं तिला बघून कोणालाही आली असती.

" कॉलेजमधून निघाल्यानंतर तुमचीं हीं मतं बनलीं वाटतं – म्हणजे मतं ठीक आहेत, पण तींच कॉलेजांत असेतों नसतील असं वाटलं मला " खोंचीनें प्रोफेसर बोलले.

" कशीं असतील तीं ? जसे प्रोफेसर तशीं कॉलेजमधील मुलांचीं मतं ! बाकी झूऑलजी शिकायला म्हणालांत तुम्हीं नाहीं का मघाशीं मला ? त्याबद्दल मला फारसा पश्चात्ताप होत नाहीं. तुमचा वर्ग सुटला, तरी शेतकरी जीवनापुरतं प्राणिशास्त्र मला इथें शिकावंच लागतं आतांशा. गोठ्यांत गाईम्हशी असतात, शेतांत पक्षी आणि कीटक असतात. आतां एवढं खरं, कीं तुमचा वर्ग म्हणजे एक लहानसा 'झू' च म्हणायचा ! काय तो गोंधळ ! काय आचरटपणा ! केवढा दंगा ! मुलींना पाहून केवढा बेशरमपणा करायचा त्या प्राण्यांनीं ! "

" आणि त्याच वर्गात तुम्ही होतां गेल्या टर्ममध्यें. "

" होय ना ! पण आतां नाहीं मी त्या वर्गात याबद्दल मला कितीतरी आनंद वाटतो."

इतक्यांत प्रोफेसरसाहेबांचा हातरुमाल खालीं पडला. आपलें तिकडे लक्ष नाहीं असें प्रोफेसरसाहेबांनीं दाखविलें व ते जावयास उठले. मिळालेल्या पाहुणचारानें त्यांचें चांगलेंच पोट भरलें असलें तरी हा एक शेवटचा तोडगा त्यांना करावासा वाटलाच. त्यांना आतां काढता पाय घ्यायाचा होता, पण तो शिस्तीनें.

" अजून आले नाहींत बाळासाहेब " ते म्हणाले व जावयास उठले. शैलाही उठून त्यांच्या मागोमाग चालूं लागली. पण तिनें पायांखालीं आपलें लक्ष नाहीं असें दाखवून तो हातरुमाल तुडवला.

प्रोफेसरसाहेब आपल्या सायकलपर्यंत गेले. शैला बाहेरच्या माणसाला ऐकूं येईल इतक्या मोठ्यानें म्हणाली,

" बुट्टोजी ! तो कसला फडका सापडला पायाखालीं तो उचलून ठेव. होईल कंदील पुसायला. "

बुट्टोजी खोलींतून बाहेर आला.

त्याला पाहिल्याबरोबर प्रोफेसरसाहेबांची स्वारी एकदम चाट झाली. कारण हा झालेला सीन आपणा दोघांमध्येंच असून तिसऱ्या कोणीं ऐकला नसेल असें त्यांस वाटलें होतें. पण तो बुट्टोजी आंत होताच तर !

गड्यानें मघाशींच दिवाबत्ती केली होती. तोही कोठें गेला होता तो आतांच आला.

" काय साहेब ! निघालांत ? " बुट्टोजीनें विचारलें.

" मास्तुरांनु चलल्यात ? " गड्यानें विचारलें. प्रोफेसर लवगे सायकलवर आरोहण करीत म्हणाले,



" अहो पण ह्या तुमचां चेप्यां ! "

[ पृष्ठ ८५

" येईन उद्यां सकाळीं सवड झाली तर ! "

" अहो पण ह्या तुमचा चेप्यां !" गडी गडबडीनें म्हणाला. प्रोफेसरसाहेब ओशाळे होऊन उद्वेगानें चालले होते. त्यांना आपल्या हॅट्‌ची आठवणच नव्हती, कारण उघड्या माथ्यानें फिरण्याची त्यांना सवय. गड्यानें दिलेली हॅट घेऊन त्यांनीं सायकल जोरानें मारली.

थोड्याच वेळांत मोटारचा आवाज ऐकूं येऊं लागला. हलधर स्वतःच मोटार चालवीत होता. मोटार पोर्चमध्यें आली आणि शैलानें लहान मुलीसारखी आनंदानें उडी मारली !



प्रकरण दहावें

# हुं—हूं ऽ ऽ हुं !

" अं ? माझी बेबी ऑस्टिन् ! " शैलानें आश्चर्यानंदानें बेहोष होऊन विचारलें. ती गाडींत उडी मारूनच बसणार होती, पण तितक्यांत तिनें आपलें मन आवरलें. आपल्या बालिशपणाला लोक हसतील ही जाणीव तितक्यांत तिला झाली. शिवाय तितक्यांत हलधर देखील गाडींतून खालीं उतरला.

शैलाचा हर्षोत्फुल्ल चेहेरा खरोखरच डोळे भरून पाहाण्यासारखा होता. हलधरला तर तो आजच प्रथम दिसला. त्यासाठींच हलधरनें जिवाची आटापीट केली होती. आपल्या परिश्रमाचें फळ आपल्याला मिळालें असें हलधरला वाटलें. त्यांनीं एकमेकाकडे क्षणभर पाहिलें. नोकरमाणसें बाजूस सरकलीं.

इंद्रियसुखनिरपेक्ष स्त्रीपुरुषांचा विवाह परस्पर सहवासाकरितां होत असतो. त्याला प्लेटोनिक विवाह म्हणून नांव असो किंवा दुसरें कांहीं असो. पण अशा विवाहांत समाधान मानून राहाणारीं जोडपीं असतात. हलधर आणि शैला यांचा सहवास अद्यापपर्यंत शरीरसुखविरहित होता. त्यांच्या विवाहाला कोणतें नांव द्यावें हें कोणालाच सांगतां येणार नाहीं. कारण तो एक नवाच प्रयोग होता. सख्य झालें, म्हणजे दोघांसही परस्परांविषयीं आकर्षण उत्पन्न झालें, तर संततिनिर्मितीसाठीं आपणही शरीरानें एकत्र यावें असें दोघांसही वाटत होतें.

भय्यासाहेब निर्धनतेंत निवर्तल्यामुळें शैलाला अधिक परावलंबित्व अनुभवावें लागत होतें. आपली आवडती मोटार बेबी ऑस्टिन् ही आपल्या मालकीची राहिल्यास ती विकून तरी कांहीं पैसा आपल्या हातीं येईल अशी शैलाला कल्पना होती. पण डॉक्टरांना औषधाच्या बिलाचे पैसे न मिळाल्यामुळें त्यांनीं ती मोटार एकदां बसण्यासाठीं म्हणून नेऊन तशीच अडकवून ठेविली होती.

शैलाची प्रिय वस्तु परस्पर देऊन टाकून तेवढ्यानेंही भद्राबाईंना आसुरी आनंद अनुभवतां आल्यास पाहिजेच होता. तशांत त्यामुळें डॉक्टरच्या बिलाचा त्रास बंद होतो आहे असें पाहून भद्राबाईंनीं आनंदानें ती मोटार डॉक्टरना देऊन टाकली. ही गोष्ट बरेच दिवस भद्राबाईंनीं शैलाला कळूं दिली नाहीं. डॉक्टर ती मोटार वापरीत नसल्यामुळें

शैलाला आपल्या आवडत्या मोटारीचा ठावठिकाण कळला नव्हता. आपली आवडती मोटार आपल्या मांडीखालीं असावी असें तिला कधीं कधीं वाटे. पाळलेला व आवडता झालेला पोपट, कुत्रा, हरिणपाडस वगैरे आपल्या हातून गेली असतां जशी आपल्याला हुरहूर लागते तशीच हुरहूर शैलाला आपल्या बेबी ऑस्टिनबद्दल कांहीं दिवस वाटत होती. भय्यासाहेबांच्या पूर्वीच्या वैभवाचें तें एकमेव स्मृतिचिन्ह व त्यांनीं मुलीला दिलेली ती एकच एक देणगी होती. पण तीही शिल्लक न राहिल्यामुळें शैलाला अतिशय दुःख होत असे.

पण हें तिचें इंगित हलधरनें अनुमानानें ओळखलें होतें. शैलाला जर तिची ' बेबी ' मिळाली तर तिला अत्यंत आनंद होईल अशी हलधरची खात्री होती. मोटारीची आठवण झाली, कीं त्या लहरींत शैला आपल्या मोटारीचा उल्लेख नुसता माझी ' बेबी ' असाच करीत असे. त्यांतील रहस्य देखील हलधरनें ओळखलें होतें. म्हणूनच नोकरमाणसें बाजूस सरकतांक्षणींच हलधर कोटी करण्याचें धाडस करून आज प्रथमच बोलला,

" तुमच्याकरितां मी आज ' बेबी ' आणली आहे. "

" फार चांगले आहांत तुम्ही ! " त्याच्या हाताला धरून शैला म्हणाली,' ' उद्यां मी ती गाडी घेऊन फिरायला जाणार. " ती आपल्या नवा रंग काढलेल्या गाडीकडे पाहात म्हणत होती, " मला तर आतांच जावंसं वाटतं मोटार घेऊन. पण परवां पाव्हणे यायचे आहेत ना ? "

" पाव्हण्यांना फिरवायला आतां आपली स्वतःची मोटार झाली." हलधर म्हणाला.

· " पण कशी मिळाली ती ? आणि मला अगदींच कळूं दिलं नाहींत कांहीं यांतलं ?"

" तें सांगतों मग. पाव्हण्यांची मला आतांच दुसरी तार मिळाली, कीं ते आणखी चार दिवस येत नाहींत म्हणून. तेवढाच अवसर मिळाला तयारीला. "

" इतकी तयारी ती कसली मेली ? " मान उडवीत जेव्हां शैलानें म्हटलें, तेव्हां तर हलधरला कितीतरी समाधान झालें. आपला दोघांचा अगदीं एकजीव झाल्यानंतर शैला संसाराच्या भागीदारींत कशी वागेल, त्याचें तें एक प्रात्यक्षिकच होतें, असें त्याच्या मनाला वाटलें. ती घटका तशीच टिकून राहावी असें हलधरला किती कितीतरी वाटत राहिलें होतें.

जेवणें झालीं. रात्रीचे दहा वाजेपर्यंत प्रौढ शिक्षणाचें काम चालतच असे हलधरचें. कधीं तो स्वतः शिकवी, तर कधीं नुसती पाहाणी करी. शैला आल्यापासून स्त्रियाही

शिकायला येत असत. दहा वाजल्यानंतर हलधर बुट्टोजीशीं आपल्या व्यवहाराच्या गोष्टी बोलत होता. त्याचवेळीं बुट्टोजीनें हलधरला शैलानें पाहुण्याची पूजा कसल्या फुलांनीं बांधली ती सर्व हकिगत खुलासेवार सांगितली.

पुढें करायची कामगिरी व व्यवहारधंद्याच्या गोष्टी बोलून झाल्यावर त्यानें कंपाउंडांतील फुलांफळांच्या दराधारणेचे हिशेब व कागदपत्र पाहावयास मागितले व तत्संबंधीं कांहीं विशेष सूचना बुट्टोजीस केल्या.

शैलानें फळझाडांचे व फुलझाडांचे कांहीं वाफे स्वतःकडे घेतले होते. त्यांची मेहेनत मशागत ती स्वतः करीत असे. त्यांचें उत्पन्न हलधर बुट्टोजीच्या हस्तें शैलालाच देववीत असे. शैला आर्थिक दृष्ट्या परावलंबी पण अत्यंत मानी स्वभावाची हें त्याला ठाऊक होतें. जरूर त्या खर्चाला तिला हलधरकडे पैसा मागण्यास संकोच वाटे आणि स्वतःकडे तर कांहींच नव्हतें. अशा स्थितींत तिच्या मानीपणास धक्का लागूं न देतां बाजारधारणेपेक्षां जास्त पैसा तिच्या मालाबद्दल तिला देतां येईल अशी दक्षता हलधरनें बाळगली होती.

शिवणकाम व कशिदा यांत ती प्रवीण होती. पण त्या कामाचे नमुने विकायला मुंबईशिवाय बाजारच नव्हता. तसलें काम ती क्वचितच करी. पण शेतीबागायतीच्या कामांत तिनें मनापासून लक्ष घातलें होतें. ओलें गवत कापणें हा तर तिचा आवडता व्यवसाय. हातांत कोयती घेऊन कामकरणी बायांबरोबर गवत कापायला बसणें तिला आवडे. ती स्वतः फारच थोडें गवत कापी. पण तिच्या नजरेसमोर मजुरीच्या बायांकडून काम भरपूर होई. आपल्या गोठ्यांतल्या गुरांना हवें तेवढें गवत ठेवून बाकीचें गवत ती विकायला पाठवी. त्याचेही पैसे तिलाच मिळत असत. पण शैलाच्या या उद्योगप्रियतेचा फारच अनुकूल परिणाम हलधरच्या कामकरी माणसांवर झालेला होता.

शैला ओलें गवत कापायला बसली असतां हलधरनें पाहिली, कीं त्याला पहिल्या दिवशींच्या प्रसंगाची आठवण होई. शेखरकडे तिनें कोयती मागितलेली त्यानें ऐकली होती. हलधरच्या घरीं तिला ती हवी असलेली कोयती मिळाली होती. कासोटा कसून कामकरी बायकांच्या मेळ्यांत ती गवत कापायला बसलेली पाहून हलधरला धन्यता वाटे व वाईटही वाटे.

इतकी शिकलेली शैला माळावर किंवा मळ्यांत बसून गवत कापते. तिच्या इतक्या शिकलेल्या मुली शहरांत कोणत्या व्यवसायांत मग्न असतात हें काय सांगायला पाहिजे ? आपल्या आश्रयाखालीं आलेल्या लक्ष्मीला आपण बटकीसारखी वागविण्याचें पातक तर करीत नाहीं ना ? अशी शंका हलधरच्या मनाला वारंवार बोचत असे. त्यावेळीं त्याला फार वाईट वाटे. त्यानें फार कष्ट न करण्याबद्दल शैलाला सांगून पाहिलें पण तिनें तिकडे दुर्लक्ष केलें होतें. हलधरनें तर तिच्या लहरीप्रमाणें वागायचें ठरविलें होतें.

कामकरी बायांना आपल्या विश्वासांत घेऊन शैलानें स्त्रियांचीं ग्रामगीतें व लोककथा यांचा संग्रह करण्याचें कार्य गुप्तपणें चालविलें होतें. कामधाम करीत असतां बायकांना गाणीं म्हणायला लावावें, त्यांच्याकडून कहाण्या सांगून घ्याव्या, त्यांना आपण गोष्टी व निरनिराळी माहिती सांगावी आणि ती देखील अशा खुबीनें, कीं अशी माहिती व करमणूक ज्यामुळें लाभते तें लिहिणें वाचणें शिकायला प्रवृत्त होऊन त्यांनीं आपण होऊन तशी विनंती शैलाला करावी. बायका व तरुण मुली शिकायला कशा तयार होतात याचें हलधरला गूढ वाटे, कारण त्यांतील हें इंगित त्याला कळलें नव्हतें.

बुट्टोजीशीं बोलून झाल्यावर हलधर घरांत आपल्या खोलींत झोपण्यासाठीं जाऊं लागला. आपल्या खोलीच्या दाराशीं शैला फिरत असल्याचें माडीवर गेल्यावर त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें पण त्यानें तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं.

तो सरळ आपल्या खोलींत गेला. त्यानें नेहमींच्या नियमाप्रमाणें आपली दैनंदिनी लिहिली. त्यानंतर ईशस्तोत्र म्हटलें, ध्यान केलें व देवाला नमस्कार करून तो झोपीं जाणार होता. तो खोलीचें दार झाकावयास गेला तों शैला तेथेंच उभी !

" कांहीं बोलायचं आहे तुमचं ? " हलधरनें अगदीं व्यावसायिकतेच्या तिऱ्हाईतपणें विचारलें.

" फार नाहीं " संकोचानें शैला खोलींत पाऊल टाकीत म्हणाली, " मोटार परत कशी मिळविलीत तें मला कळलं पाहिजे होतं."

" एवढंच ना ?" मनमोकळेपणानें हसून हलधरनें म्हटलें, " डॉक्टरांकडून मी ती तुमच्यासाठीं विकत घेतली आहे."

" किती किंमतीला ? "

" तें कशाला तुम्हांला ? "

" नाहीं पण, सांगा ना ? "

" तें नाहीं विचारलंत तर मला बरं वाटेल ? "

" बरं..." नाखुषीनें आणि नाइलाजानें शैलानें म्हटलें, " पण पैशांची काय व्यवस्था केलीत तें तरी सांगाल ? " तिनें काकुळतीनें विनंती केली. हलधरच्यानें ती विनंती मोडवेना. तो व्यवहार देखील तिला सांगायचें त्याच्या मनांत नव्हतें पण तिचें मन साफ नाखूष करणें त्याच्या अगदीं जिवावर आलें.

" मीं एक हप्ता दिला आहे आणि दुसरापण सवडीप्रमाणें देणार आहें. "

हलधरच्या पलंगाच्या उशीकडच्या बाजूच्या पलीकडे एक लहानसें टेबल आणि खुर्ची होती. त्या खुर्चीला टेकून शैला खालीं पाहात उभी होती. सैल झालेल्या आंबाड्याचे केस कानांवरून गेले होते. त्याच्या खालीं कानांच्या मोकळ्या पाळ्या गमतीच्या दिसत होत्या. लहानपणीं घातलेल्या हिऱ्यांच्या कुड्या ती हल्लीं वापरीत नसे. त्या तिनें मुंबईहून आल्यावर काढून ठेवल्या होत्या. साध्या कुड्या तिच्याकडे नव्हत्या. तिला मोत्यांच्या कुड्या घेण्याबद्दल बाईंनीं हलधरला टुमणें लावलें होतें. पण हलधरनें या बाबतींत बाईंचें ऐकलें नव्हतें. जेवढी रक्कम व्यवहार सांभाळून शिल्लक टाकतां येईल तितकी त्यानें मोटारकरितां खर्चीं घातली होती. म्हणून त्या मोकळ्या पाळ्यांकडे लक्ष जातांच हलधरला बाईंच्या सांगण्याची आठवण झाली. त्यामुळेंच तो त्या पाळ्यांकडे किंचित्काल पाहात राहिला होता.

" बसायला हरकत नाहीं कांहीं. " हलधरनें नजर दुसरीकडे फिरवून म्हटल.

दिव्याच्या प्रकाशांत रंगीत किनारीचें शुभ्र पातळ नेसलेली शैला गोरी नाहीं असें म्हणतां आलें नसतें. तिच्याहून गौरवर्ण स्त्री जवळपास असली तरच शैलाचा निमगोरेपणा लक्षांत येत असे.

चार दिवसांपूर्वीं गवत कापीत असतां डाव्या हाताच्या करांगुळीच्या मुळाशीं कोयती लागली होती. त्या ठिकाणीं आलेली खपली वाळत आली होती. ती उकलून काढण्यांत शैला गुंतल्यामुळें तिची मान खालीं होती. ती त्या खुर्चीवर बसली.

" मोटार परत करा आणि दिलेले पैसे परत घेऊन या, अशी विनंती करत्ये तुम्हांला. "

शैलाच्या चर्येंत ओतप्रोत कारुण्य भरलें होतें. शिवाय त्यांत संशयाचे ढग मधून मधून वावरत होते. तिची दृष्टि क्षणांत शोधक आणि क्षणांत भेदक बनत होती. ती कशाकरितां आली आहे आणि तिला काय बोलायचें आहे हें जाणून घ्यायला बुचकळ्यांत पडलेला हलधर अगदीं उत्सुक झाला होता. शेवटीं तिची ही विलक्षण मागणी ऐकून तो स्तंभितच झाला.

" कां ? "

" माझ्यासाठीं मोटार तुम्ही आणलीत खरी, पण त्यामुळें तुमच्या उदात्त तत्त्वाला बाध येत आहे. आनंदाच्या भरांत माझ्या हें लक्षांत आलें नाहीं. माझी प्रिय वस्तु मिळाल्याबद्दल मला कितीतरी बरं वाटलं. पण यांत आपली चूक होत आहे आणि तीदेखील माझ्यामुळें — माझ्या हौसेकरितां तुम्ही माझी ' बेबी ' आणलीत. पण ती एकदम विकत घेण्याकरितां तुमच्याजवळ भरपूर पैसे नाहींत. कदाचित् उधारीचा सौदा केला असेल. मी म्हणतें नकोच ती आपल्याला. "

" पण आपला व्यवसाय आतां वाढत चालला आहे. तसंच आपल्याकडे येणारी जाणारी पाव्हणेमंडळीही बरीच असते. शिवाय आपल्याला बाजाराला आणि कामा-काजानिमित्त तालुक्याच्या गांवीं किंवा इतर शहरीं झटपट जाऊन यावं लागतं. अशा गरजांसाठीं मोटार ठेवली तर ती अगदींच आंगाशीं येणार नाहीं. मी कांहीं ती तशी बिनहिशेबी घेतलेली नाहीं अथवा केवळ माझ्या चैनीसाठीं घेतलेली नाहीं. "

" तुमचे जमाखर्चाचे सगळेच व्यवहार मला कांहीं ठाऊक नाहींत. तेव्हां हा सौदा हिशेबी आहे, कीं बिनहिशेबी हें मला कळायचं नाहीं. पण जर ती मोटार माझ्यासाठीं म्हणून घेतली असेल..." इतकें बोलून ती थांबली. कारण आपल्याकरितांच बाळासाहेबांनीं ती मोटार घेतली हें तिला ठाऊक होतें. पण तसें तो कबूल करतो कीं नाहीं हें तिला स्पष्टपणें ऐकायचें होतें.

" तर काय ? " हलधरनें विचारलें.

" तर मात्र ती चैनच केल्यासारखं होईल. " हलधरनें उत्तर द्यायची चुकवाचुकव केलेली शैलाला तितकीशी आवडली नाहीं. तिला आपलें बोलणें पुरें करणें भाग होतें.

" शिवाय तुमच्या प्रत्येक कृत्यावर तुमच्या टीकाकारांचा आणि तुमच्यावर रुष्ट झालेल्या लोकांचा डोळा आहे ना ? "

" तें मला ठाऊक आहे. मी केलेल्या प्रत्येक वाजवी गोष्टीचा विपर्यास केला जात असून माझ्या विरुद्ध काहूर उठलं आहे हें मला ठाऊक आहे. पण विवेकबुद्धीचं समाधान हेंच माझं सामर्थ्य. परमेश्वरसाक्षीनें जोंपर्यंत मी सदसद्विवेक बुद्धीच्या कौलानुसार वागत आहें, तोंपर्यंत मला दुष्ट लोकांच्या कारवाईची बिलकुल भीति वाटत नाहीं."

मघांपासून शैला संशयग्रस्त मुद्रेनें हलधरकडे पाहात होती. तिच्या मनांत विशेष कांहींतरी बोलायचें आहे, हें हलधरनें ताडलें होतें. आतांपर्यंत शैला जें कांहीं बोलली त्याहून जास्त, त्याहून निराळें असें कांहींतरी शैलाला सांगायचें आहे आणि तें सांगायला ती कडमडते आहे, ही गोष्ट हलधरच्या ध्यानांत येऊन चुकली होती.

हलधरचें आतांचें उत्तर ऐकून शंकेचें थोडेंबहुत समाधान झाल्यावर जसें वाटावें, तसें शैलाला वाटत असल्याचें तिच्या चेहेऱ्याकडे पाहून हलधरच्या निदर्शनास आलें.

दोघेंही किंचित्काल स्तब्ध होतीं. बाहेर घूग ओरडत होती. –हूं—हूं-हुं ! हूं-हूं–हुं !

भिंतीवर दत्ताची तसबीर होती. तेथें हलधरनें अगरबत्ती लावली होती. तो सुवास खोलींतील वातावरण प्रसन्न करीत होता. वाऱ्याची एक झुळूक घरांतून आली. सभोंवतालीच फिरणारें अगरबत्तीच्या धुराचें वेटोळें पसरत पसरत पिंजारल्यासारखें होऊन अदृश्य झालें. झुळूक बाहेरून आली एवढेंच निमित्त घेऊन शैलानें बाहेर पाहिलें. झुळुकीनें बंधनांतून सुटलेली केसांची एक छोटुकलीशी बट आतांच्या हालचालीनें उजव्या भुंवयीच्यावर वरचेवर अलगद नाचूं लागली. हलधरच्या नजरेंतून ती निसटली नव्हती. पण हलधरनें आत्मसंयमन करून आपली नजर आपल्या उशीकडे फिरविली. उशीच्या त्या अभ्रयावरील नांव शैलानेंच विणलें होतें.

हलधर उठला आणि तो आपला बिछाना साफसूफ करूं लागला, म्हणजे नुसता हात फिरवून झटकूं लागला. तें पाहून शैलाची मुद्रा अधिकच कारुण्यपूर्ण आणि चिंतामग्न झाली. तिच्या मनांत असंख्य विचार थैमान घालीत होते.

आज आपण हलधरला पेंचांत पकडणार म्हणून ती आली होती. निदान एका लोकापवादाचें स्पष्टीकरण तरी द्यावयास हलधरला भाग पाडणार असा तिचा ठाम निश्चय झाला होता. पण तो आतां लटपटूं लागला होता. म्हणून तिनें मुख्य विषय

बोलावयास मनांत ठरविलेल्याप्रमाणें सुरुवात न करतां अगदीं निराळ्याच तऱ्हेनें करायचें ठरविलें.

" धाकजीच्या घरीं आपण जें जेवण पोचवतों तें तिला नीटपणें मिळतं तरी का ? "

" कां ? " हलधरनें आपल्या बिछान्यावर बसून शैलाकडे रोखून पाहात विचारलें.

" तिची विचारपूस प्रत्यक्ष जाऊन करायला नको का ? "

" करतों मी केव्हांतरी. "

" पण या दोन दिवसांत मीच केव्हांतरी स्वतः जाणार तिला जेवण घेऊन. "

" नको, सध्यां तिकडे जातां नये. "

" कां ? "

" तिचा नवरा — धाकजी आलाय्. "

" पण मी जाणार अशीच तिच्याकडे. "

" पण तें धोक्याचं आहे तसं करणं. "

" धाकजी आला तर आपणाला त्याची कसली भीति ?

" तो तऱ्हेवाईक माणूस आहे. शिवाय तो दारूही पितो आणि बायकोला मारहाण देखील करतो. त्याचा माझ्याविषयीं फार गैरसमज झालेला आहे, अथवा कुणीतरी करून दिलेला आहे. "

" हो का ? कां म्हणून तो ? "

" कुणी चौकशी केली आहे ? मला काय त्याची पर्वा ? तुमचा तसा हट्टच असेल तर माझं कांहीं म्हणणं नाहीं. सूचना करण्याचं कर्तव्य माझं. ऐकणं न ऐकणं तुमच्या मर्जीवर. "

इतकें म्हणत असतांच वाऱ्याची मोठी झुळूक आली आणि दिवा विझला. खोलींत काळोख झाला. शैला हलकेच खोलीबाहेर पडली. थंड वारा आणि घुगीचा तो तिहेरी शब्द हूं—हूं–हुं ! शैलाच्या आंगावर शहारे आले. ती काळोखांतूनच आपल्या खोलीकडे निघाली. तिच्या मनांत संशयकल्लोळ माजून राहिला होता. तत्संबंधीं तिनें उलगडा करून घेण्याचा उपक्रम करून पाहिला. तिला वाटलें, हलधर कितीतरी निष्पाप माणूस !

' पण स्त्रीपुरुष संबंधांत आपले सारे ठोकताळे फुकट जातात. सारीं माणसं कुजबुजतात तें काय उगीच ? '

आपल्या खोलींत गेल्यावर शैलानें दिव्याकडे बसून एक पत्र उघडून पुन्हा वाचलें.

तिच्या संशयाला पुन्हा बळकटी आली. धाकजीच्या बायकोला तिनें स्वतः कधींच पाहिलें नव्हतें पण ती देखणी असल्याचें तिनें ऐकलें होतें.

शैला आपल्या खोलींतून बाहेर पडल्याची पावलट ऐकतांच हलधरनें दार लोटलें. तो लवकरच झोपीं गेला.

घूग सारखी ओरडत होती...

"हूं—हूं–हुं!"

कोणी म्हणतात, कीं ही घूग एक नसून ती नरमादीची जोडी असते. पहिला आणि तिसरा ध्वनि त्यांतील एक करीत असते व तो एकाच स्वरांत. मधला म्हणजे अनुक्रमानें दुसरा ध्वनि दुसरा, नर काढीत असतो व तो चढ्या सुरांत. त्यामुळें त्या तीन ध्वनींचा मेळ कांहीं चमत्कारिकच उमटतो. शिवाय मधला चढ्या स्वर बराच दीर्घही असतो. त्या आवाजाचें नोटेशन केलें तर तें "सा–ग–सा" असें होईल.

"हूं—हूं—हुं!"

काळीकुट्ट रात्र. शैला पुन्हा दिव्याकडे पत्र वाचीत बसली होती. त्या पत्रांत हलधरची नालस्ती केलेली होती. पत्र शेखरचें होतें पण तें विलक्षण खुबीनें लिहिलें होतें. हलधरच्या आंगचे कांहीं सद्‌गुण कबूल करूनदेखील एक दोन गुणांना असें विकृत स्वरूप दिलें होतें, कीं हलधर हा हरिणाचें कातडें पांघरणारा क्रूर वाघच आहे असें तें पत्र वाचणारास वाटावें.

शैलाला तसें क्षणभर वाटलेंदेखील.

'हलधर किती ढोंगी आहे. त्याचें सगळें वर्तन शुद्ध. पण धाकजीच्या बायकोविषयीं त्याला इतका जिव्हाळा कां वाटावा? आणि आपणाशीं विवाह करण्यांत त्याचा काय हेतु असावा?

'आपण इतकी निकट सान्निध्यांत असून ज्याअर्थीं हलधर प्रेमाविष्कार करीत नाहीं, त्याअर्थीं त्या भावनेला कुठें तरी वाव मिळत असला पाहिजे, असं जें शेखर लिहितो तें खरें असेल काय?'

हलधर गाढ झोपला होता.

शैला तळमळत होती.

अर्धनिद्रिस्त माणसांच्या मनांत उद्भवणाऱ्या विचारांना हुंकार देणारी घूग रात्रपहारा करीत होती.

"हूं—हूं—हुं!"

प्रकरण अकरावें

# निशेंतील कृत्य !

घुबडें जोडीनें हुंकार देत बसलीं, कीं तसें करणें हा एक प्रकारचा शकुन आहे असें कोंकणांतलीं जुनीं माणसें समजतात. शैला हलधरच्या खोलींत असतांना वाऱ्यानें दिवा मालवला गेला तेव्हां जिन्यांत एखादें पाऊल वाजल्यासारखा भास झाला होता. पण शैलाचें तिकडे लक्ष नव्हतें.

सकाळीं शैला उठल्याबरोबर विशेष परिचयाचीं बाया माणसें शैलाकडे गालांतल्या गालांत हसत असलेलीं दिसलीं. बाई तर फारच खुषींत होत्या.

" रात्रीं घूग ओरडत होती. " एकजण म्हणाली.

" कोन् तरी गुरवार रवतालां गो ! " दुसरी तिला उत्तरादाखल म्हणाली.

दोघीही तोंडाला पदर लावून आणि शैलाकडे पाहून हसत होत्या. शैलाला त्यांचें बोलणें उमगलें. ती तें ऐकायचें टाळण्याकरितां दुसरीकडेच गेली.

अशा प्रकारचें घुबडाचें जोडपें ज्या घराशेजारीं ध्वनि करीत असेल त्या घरांतील स्त्री गरोदर असते, किंवा गरोदर राहाण्याचा संभव असतो अशी लोकांत समजूत आहे.

त्या दिवशीं सकाळीं बागेंतून फिरून येतांना शैलानें सुंदरशीं शेवंती आणलीं होतीं. विकायला पाठवायच्या वेण्या शैलानें बायांकडून करून घेतल्या. कांहीं फुलें सुटींच ठेवलीं होतीं. त्यांतील शेवंती घेऊन मोलकरणीनें एक छानदार वेणी शैलाकरितां घातली होती. त्यांत तिनें आबोलीचीं फुलें, थोडा कलाबूत आणि हिरवीं पानें गुंफून सुंदर 'जिबली पाती' तयार केली होती. ती शैलाकडे देऊन तिनें माळावयास सांगितली. शैलानें विशेषशी आतुरता दाखविली नाहीं ! पण तिला ती 'जिबली पाती' आवडली होती.

मोलकरणीनें स्वतःच शैलाला ती अत्याग्रहानें घातली. शैलाला ती फारच शोभून दिसली. कांहीं विशेष कामासाठीं हलधर कोटरुमाल घालून बाहेर जात असतां त्याची नजर जेव्हां शैलाकडे गेली, तेव्हां तो क्षणभर थांबला व स्मितहास्य करीत निघून गेला. तो दुपारीं यायचा होता. गांवच्या सभ्य लोकांकडे जायचें असल्यास तो असला कोटरुमालाचा पोषाख करीत असे.

बाईनीं भटजीस बोलावून आणून माउली देवीला एकादशणी करायला सांगितलें होतें. त्याच बोवाळांत त्या होत्या; कारण त्या स्वतःच देवपूजेला देवळांत जाणार होत्या. त्यांना एक प्रकारचा आनंद झाला होता.

दुपारीं हलधरकडून निरोप आला, कीं आपण दुपारीं येऊं शकलों नाहीं, संध्याकाळीं येऊं.

संध्याकाळीं सुमारें सात वाजतांना शैला आपली आवडती मोटार घेऊन जराशी फिरवून आणायला म्हणून निघाली. बुट्टोजीही सायकल घेऊन बाहेर गांवीं कांहीं कामानिमित्त गेला होता.

तिठ्यापर्यंत गेल्यावर शैला मोटार वळवायच्या बेतांत होती इतक्यांत तिला एक माणूस येऊन भेटला.

" शैलाबाई तुम्हींच काय ? " त्यानें मान वाकवीत अदबीनें विचारलें.

" हो.कां बरं ? "

" भद्राबाईनीं ही चिठी दिली आहे. "

" द्या. " शैलानें हात पुढें करून तें पत्र वाचलें. ती चकित झाल्यासारखी दिसली.

" तुम्हींही आंतच या बसा. कसं आहे आतां त्यांचं ? " शैलानें काळजींत पडून विचारलें.

" आतां कमी आहे पण तुम्हांला भेटायची त्यांची फार इच्छा आहे. तुमचं लग्न झाल्याचं त्यांना इतके दिवस ठाऊक नव्हतं. हल्लींच कळलं. तुम्हां उभयतांना बोलवायचा त्यांचा विचार आहे. पण तें मागून केव्हांतरी. "

हा इसम पठाणासारखा दिसत होता व तो हिंदुस्थानींत बोलत होता.

काळोख पडला होता. शैलानें फिरून मोटार वळविली आणि आपल्या माहेरच्या वाटेनें निघाली. घरीं जाऊन पोचल्यावर तिला कळून आलें, कीं भद्राबाई चांगल्या असून घरांतही विशेष टापटीप दिसत होती. भद्राबाईच्या तोंडावर आजारीपणांतून उठल्यासारखा कांहींसा अशक्तपणा दिसत होता.

थोडेसे कुशलप्रश्न वगैरे झाल्यावर शैलाला दूध प्यायचा भद्राबाईनीं फार आग्रह केला. मसाल्याचें दूध शैलाला फारच स्वादिष्ट लागलें.

त्या गांवांत जे जमीनदार लोक होते ते हलधरच्या शेतीच्या प्रयोगाकडे कुतूहलानें पाहात होते. शेतीच्या प्रयोगाकडे याचा अर्थ शेतसुधारणुकीच्या अथवा ग्रामोद्धाराच्या

प्रयोगाकडे नव्हे, तर शेतकऱ्यांच्या संपास तोंड देण्याच्या प्रयत्नाकडे ते लक्षपूर्वक पाहात होते. संपाच्या संकटांत सापडून एक जमीनदार भिकेस लागला होता. शेतकऱ्यांची ही संपाची वावटळ फार वेळ टिकली नसली तरी तिनें जमीनदार लोकांच्या तोंडचें पाणी पळविलें होतें. हलधर स्वतः शेतकींत लक्ष घालणारा होता, म्हणूनच तो टेक धरूं शकला. पण जमिनीचे मालक असून शेतीचें कसलेंही काम न समजणारे आणि कुळांकडून खंड घेऊन व सरकारदस्त देऊन चरितार्थ चालविणारे, अथवा जेमतेम दिवस कंठणारे असेच पुष्कळसे नामधारी जमीनदार होते. हलधरनें संपास न डगमगतां स्वतःच शेती करायला सुरुवात केली, यामुळें या जमीनदार गांवकऱ्यांची सहानुभूति प्रथम कांहीं दिवस हलधरला मिळाली. पण हलधर शेतकऱ्यांची खरी सुधारणा करूं पाहात आहे हें पाहून गांवकरी लोक बिथरले. शेतकऱ्यांना शिकवून शहाणे करणें, त्यांना दुखण्याबाण्यांत मदत करणें, त्यांना खंडांत सवलती देणें, कोणाला सरकारी तगाईप्रमाणें आगाऊ पैसे देऊन पड जमिनी लागवडीस आणणें व त्यांना कामधंदे देऊन आणि त्यांची उत्पादनशक्ति वाढवून आपलें कर्ज त्यांतूनच परस्पर वसूल करून घेणें या हलधरच्या गोष्टी गांवकऱ्यांस मानवेनातशा झाल्या. यामुळें असंतुष्ट संपवाले व अदूरदर्शी आणि आपमतलबी गांवकरी या दोन्ही पक्षांचा रोष हलधरला सहन करावा लागत होता. वैवाहिक जीवनांत तर त्याला अद्याप सुख लाभलें नव्हतें. पण त्याच्या या प्रयोगांकडे देशांतले समंजस लोक बारीक नजरेनें पाहात होते. ग्रामसेवेच्या ध्येयानें प्रेरित झालेला हलधरचा जीव संकटांत सापडला असूनही गुणज्ञ व समंजस माणसांकडून मिळणाऱ्या उत्तेजनाच्या आधारानें आपला कंटकमय मार्ग आक्रमीत होता. कौटुंबिक सुखासमाधानाच्या अभावीं कीर्तीच्या सरबताचा पेला भावनाशील व महत्त्वाकांक्षी मनुष्याला उत्साह देतो, पण जीवन देऊं शकत नाहीं.

गांवकऱ्यांनीं हलधरला गाठून याबाबतींत पुष्कळ चर्चा केली आणि हलधरचें धोरण घातुक असून तें त्यानें लवकर बदलणें इष्ट आहे असें उपदेशिलें.

उलट हलधरनें प्रस्तुत काळ कसा आहे व आपण शेतकऱ्यांसच हातांत धरून कसें वागलें पाहिजे हें ठसविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. या वादविवादांत बराच वेळ मोडला. नंतर आपल्या व्यावसायिक कामाधंद्याची वासलात लावून घरीं येण्यास हलधरला बराच वेळ लागला. त्याला काळोखांत कोणीतरी सोबतीस घ्यावेंसें वाटलें पण खिशांत विजेची बत्ती असल्यामुळें त्यानें एकटेंच घरीं जायचें ठरविलें.

येतांना वाटेंत दारूचा गुत्ता लागला. हा दारूचा गुत्ता गांवाची राखरांगोळी करीत आहे अशी त्याची खात्री होती. 'गांवोगांवचीं दारूदुकानं बंद झाल्याशिवाय शेतकऱ्यांची सुधारणा कसली होणार ? शेतकऱ्यांच्या आणि कामकऱ्यांच्या कानांत वर्गद्वेषाचं आणि वर्णद्वेषाचं वारं फुंकणारे समाजसुधारक हीं दारूदुकानं आणि चहाचीं दुकानं कां बंद करीत नाहींत ? श्रमजीवी लोकांच्या उन्नतीसाठीं तळमळणारे हे जगदुद्धारक पुण्यात्मे त्यांचं खरं हित कशांत आहे तें न पाहातां असलेली घडी बिघडविण्याचंच तेवढं शतकृत्य कां करीत राहातात ?' अशा प्रकारच्या विचारांत गर्क झालेला हलधर काळोखांतून चालला होता. जरूर तेव्हांच तो बत्तीचा प्रकाश बटन दाबून आसपास अगर पायाखालीं टाकीत असे. धाकजीच्या घराच्या आसपास तो आला होता. त्याला मरणोन्मुख माणसाची कर्णभेदक किंकाळी ऐकूं आली.

शरीरांतून विजेचा प्रवाह गेल्यासारखें त्याला वाटलें. त्याच्या आंगावर शहारे आले. पायाखालीं पातेऱ्यांत त्याला कांहींतरी सरसरल्यासारखें वाटलें. त्यानें उजेड फेकला. कसलें तरी किरडूं होतें. त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें. तो धाकजीच्या घराकडे धापा टाकीत धावला.

धाकजीच्या घरांतून कोणीतरी बाहेर पडलें व तें घराच्या पाठीमागील परसांत गेलें. हलधरनें धाकजीच्या दारांत जाऊन घरांत दृष्टि फेंकली. घरांत काळोख होता. दार अर्धवट उघडें होतें. हलधरनें बत्तीचा प्रकाश आंत सोडला. धाकजीची बायको मरून पडली होती ! मुलगा कोठेंच दिसत नव्हता. धाकजीचा कोठें पत्ताच नव्हता.

हलधर दारांत उभा असतांच धाकजी बाहेर पडला. त्याला एकवार वाटलें, कीं हलधरवर झडप घालावी. पण तसें केल्यास अवाढांतलीं माणसें जमतील म्हणून त्यानें हलधरला हुलकावणी दाखविण्याचा बेत केला व तो बराच यशस्वीही झाला.

हलधरला मागील्दारीं माणसाची चाहूल लागतांच तो तिकडे वळला. पण धाकजीला हलधरवर हल्ला करण्याचें धैर्य होईना. शेवटीं त्यानें आत्महत्या करण्याचें ठरविलें, म्हणून तो नदीकांठच्या वाटेनें धावूं लागला.

नदीकांठ सुमारें दीड फर्लांगावर होता. धाकजी पुढें आणि हलधर मागें असे दोघे धावत होते. धाकजीनें नदींत उडी टाकली. नदींत उडी टाकीत असतां त्याला मोटारीचा आवाज ऐकूं आला. उडी टाकल्याबरोबर त्याला एक दोन माणसांच्या आरोळ्याही ऐकूं

आल्या. पण तिकडे त्याचें लक्षच नव्हतें. तो सपासप दोन्ही हातांनीं पाणी तोडीत चालला होता.

धाकजीचा पाठलाग हलधर करीत असतांच रस्त्यावर शैला मोटारींतून आपल्या माहेरहून आली होती. आरडाओरड ऐकून तिनें मोटारींतून बाहेर उडीच मारली. मोटार ती स्वतःच चालवीत होती. सोबतीला तिनें कोणालाही घेतलें नव्हतें. त्यामुळें रस्त्यावर उतरतांच नदीकांठीं कसें जावें याचा विचार करीत ती पांच मिनिटें उभी राहिली होती तोंच एक सायकलवाला तेथेंच उतरला. मोटारींतून येत असतां एका सायकलवाल्याला आपण मागें टाकल्याचें तिच्या लक्षांत आलें. त्याला तिनें ओळखलें नव्हतें. पण आतां तो समोर येतांच त्याला तिनें ओळखलें. तो बुट्टोजी होता.

थोडा वेळ दोघांनीं काय घडलें असावें याविषयीं विचार करण्यांत घालविला. पण बिथरलेल्या धाकजीच्या हातीं हलधर सापडला असावा असें त्यांस वाटलें. मोटार आणि सायकल रस्त्याच्या बाजूस ठेवून तीं दोघेंही धावतच नदीकांठीं आलीं. येतांना लोकांना जमविण्यासाठीं त्यांनीं आरोळ्या मारून इशारा दिला.

थोड्याच वेळांत एक दोन माणसें कंदील व चुडी घेऊन आलीं. त्यांना पाण्यांत पोहणाऱ्यांचा आवाज ऐकूं येत होता. सर्व जण भयभीत होऊन, काय झालें याविषयीं तर्क करीत नदीकांठावर राहिले होते.

धाकजीला पोहायला येत नव्हतें. शिवाय त्या नदींत हलधरनें आपल्या बागायतीच्या हद्दीस धरून वरलें वांधलें होतें, त्याच्या खालीं पाण्याला मोठी कोंड असून तेथें भला थोरला भोवरा होता. त्या भोवऱ्यांत सापडलेला माणूस मुळींच जगणें शक्य नव्हतें, मग तो कितीही पट्टीचा पोहणारा असो. त्या भोवऱ्यांत जाण्याच्या हेतूनेंच धाकजीनें उडी मारली होती. नदीला सुक्ति लागली होती, त्यामुळें धाकजी भोवऱ्याच्या दिशेनें वाहात जाऊं लागला होता. त्याच्या नाकातोंडांत पाणी शिरून त्याचें प्राणोत्क्रमण व्हावयाच्या पूर्वीं हलधरला त्याला गाठायचें होतें. म्हणून जिवावर उदार होऊन हलधर पाणी कापीत होता.

हलधरची विद्युद्दीपशलाका शैलाच्या हातीं लागली. ती त्यानें नदीकांठीं आपल्या कपड्यांबरोबरच फेकून दिली होती. बुट्टोजीकडे लहानशी बिजलीची एक बत्ती होती तिच्या उजेडांत शैलाला हलधरची बत्ती ओळखतां आली. तिनें ती चटकन् उचलून तिचा प्रकाश नदींत सोडला. त्यामुळें तिला दूर अंतरावर नदीच्या पृष्ठभागावर हलधरचें

मस्तक दिसलें. तो धाकजीचें मस्तक आपल्या डाव्या खांद्यावर धरून पाणी तोडीत येत होता. जेथून त्यांनीं उड्या घातल्या होत्या तेथेंच परत येणें शक्य नव्हतें. कारण सुक्तीच्या वेळीं पाण्याच्या ओघाच्या उलट नुसत्या आंगानें पोहत जाणें देखील फार अवघड असतें. मग पाठीवर धाकजीचें ओझें घेऊन येणें म्हणजे अगदींच अशक्य. म्हणून तो जमिनीकडे नदीकांठावर येण्यासाठीं खालींखालींच पोहत चालला होता. डावीकडे त्याला पाण्यांतून सरकावें लागत होतें. तो जसजसा खालीं खालीं जाऊं लागला, तसतशीं कांठावरचीं माणसेंदेखील खालीं खालींच जाऊं लागलीं. जात असतां तीं माणसें त्या भोवऱ्यांत यापूर्वी कोणकोणत्या प्रसंगीं कोणकोणते अपघात झाले व कोणकोणते जीव दगावले याविषयींचा साद्यंत इतिहास सांगत होती. तो भोवरा हलधरनें केव्हांच चुकविला होता. हलधरनें धाकजीला गाठून आणला होता. पण धाकजी जिवंत सापडला कीं मेलेला, एवढेंच आतां पाहायचें राहिलें होतें.

आस्ते आस्ते अधिकाअधिक माणसें जमत चाललीं होतीं. एका दोघांनीं इतक्यांत नदींत "सौदा" देखील लोटला होता. पण त्याची मदत मिळण्यापूर्वीच हलधर पाणी तोडीत नदीकांठाला लागला. त्याचा तो सिंहासारखा पराक्रम पाहून शैला स्तिमित झाली. कॉलेजांतील सामन्यांत तो विजयी झालेला तिनें पाहिला होता. पण त्या सामन्यांत नुसतें कलेचें प्रदर्शन होतें. या शर्यतींत जीवनोपयुक्तता होती. तें नुसतें प्रमेय होतें, हें प्रत्यक्ष उदाहरण होतें. तें निव्वळ तत्त्व होतें, हा त्याचा अनुभविक दाखला होता. ती निव्वळ करमणूक होती, हा जीवनमरणाचा प्रश्न होता.

सर्व लोकांनीं हलधरभोवतीं गर्दी केली. हलधर फार थकून गेला होता. तरीही धाकजीकडे लक्ष देणें त्याला अत्यंत आवश्यक होतें. धाकजी निश्चेष्ट पडला होता.

त्याच्या पोटांत पाणी गेलें होतें. प्रथमोपचारांनीं तें पाणी काढणें हें पहिलें काम होतें. तें काढल्यावर धाकजी जिवंत असल्याचें सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस आलें आणि सगळ्यांस त्यामुळें आनंद वाटला. धाकजीला प्रथमोपचार करण्यांत शैलानें भाग घेतला होता.

धाकजीला न्यायचा कोठें हा प्रश्न होता. त्याबद्दल चर्चा चालली असतां हलधरला धाकजीच्या बायकोची आठवण झाली.

"धाकजीची बायको मरून पडली आहे, तिला आधीं कुणीतरी..."

इतक्यांत धाकजीनें डोळे उघडल्यामुळें हलधरचें वाक्य तोंडांतल्या तोंडांतच राहिलें.

धाकजीनें डोळे उघडले आणि पुन्हा मिटले. त्याला मूर्च्छा आली होती.

हलधर स्वतः जरा बाजूस सरला आणि इतरांनाही मोठ्यानें न बोलण्याबद्दल खुणावलें. तरीही ते आपापसांत कुजबुजतच होते.

" धाकजीची बायको मरून पडली आहे ? कांहींतरीच ! " एकजण म्हणाला.

" तिचा खून करायला धाकजी आज तयार झाला होता. दारू पिऊन आल्यावर त्यानें बायकोला मारली असली पाहिजे." दुसरा कोणीतरी बोलला.

" छे ! छे ! अरे ती गाढ झोपली आहे. मी तिला घोरतांना ऐकलें ! " आणखी एकानें म्हटलें.

" अरे ! काय बोलतां ? तिला ती शेवटची घरघर लागली असेल. " दुसरा इसम म्हणाला.

" काय बडबडतां आहांत ? धाकजीसारखीच तुम्ही देखील थोडथोडी पिऊन आलां वाटतं ? धाकजीची बायको या कुशीवरून त्या कुशीवर वळतांना मी स्वतः या माझ्या डोळ्यांनीं दार उघडून घरांत जाऊन पाहिली. " पहिला इसम म्हणाला.

" आणि त्याचा मुलगा ऽ " कोणीतरी विचारलें.

" मुलगा मात्र आम्हांला कुठेंच दिसला नाहीं. " दुसरा कोणीतरी उत्तरादाखल आश्चर्य व्यक्त करीत म्हणाला.

" चला तर, त्यांचं काय झालं तें बघूं या. " एकानें सुचविलें.

" चला तर चला ! " दोघे तिघे निघण्याची तयारी दर्शवीत बोलले.

लगेच पांच सात असामी धाकजीच्या घरीं जावयास निघाले. सगळेजण आपल्या नेहमींच्या खेडुती कोंकणी भाषेंतच बोलत होते. त्यांनीं कंदील, चुडी वगैरे घेतल्या होत्या.

शैला आज धाकजीच्या बायकोला जेवण पोचविण्याकरितां म्हणून येणार होती. तिला एकटी गांठून तिची सारी हकिगत सरळ सरळ विचारून घ्यावी, कीं तिला नुसती पाहून घेऊन अनुमानानेंच सारा प्रकार कसा काय आहे याचा अजमास काढावा याबद्दल तिच्या मनांत सकाळपासून भवति न भवति चालली होती. नंतर संध्याकाळच्या सुमारास मोटार बाहेर काढायचें एकदा मनांत आल्याबरोबर धाकजीच्या घरीं जायचें तिनें दुसऱ्या दिवसावर टाकलें.

धाकजीची बायको सुस्वभावी, कामसू आणि सुंदर होती, असें सगळीं म्हणत. आतां तिच्याबद्दल बोलतांना देखील दोघांतिघांनीं आपापसांत कुजबुजत हलकेंच हलधरचें नांव उच्चारलेलें तिनें ऐकलें होतें व हलधरकडे पाहून त्यानीं चमत्कारिकपणानें

नेत्रंसेकत केलेले पाहिले होते. स्त्रियांच्या चारित्र्याबद्दलचा नाजूकपणा जाणणारी व तत्संबंधीं हलधरशीं तत्त्वचर्चा करणारी शैला आपल्या मनांत असल्या जनपवादाला क्षणभर तरी कां बरें थारा देते ? तिचें मन देखील अतिमानवी नव्हतें म्हणूनच का ? कोणी सांगावें ?

रस्त्यावरील मोटारींत धाकजीला घालून त्याला आपल्या घरीं नेण्याचें हलधरनें ठरविलें. रस्त्यापर्यंत दोघांचौघांनीं त्याला अलगत उचलून न्यायचा बेत केला.

शैलानें मोटारीकडे जातांना धाकजीच्या घरावरून जाण्याची इच्छा व्यक्त केली आणि त्याप्रमाणें ती निघालीही.

'हलधरच्या वागणुकींत जो एक प्रकारचा राकट खेडवळपणा दिसतो, तेवढा त्याच्यांत नसता तर किती चांगलं झालं असतं ? शेखर त्या बाबतींत हलधरपेक्षां सरस'. असे विचार शैलाच्या मनांत घोळत होते.

शेखरनें हल्लीं जीं पत्रें शैलाला पाठविलीं होतीं त्यांत उदात्तपणा ओतप्रोत भरलेला होता. शैलाचें लग्न झाल्याचें ऐकल्यानंतर त्यानें आजन्म अविवाहित राहाण्याची प्रतिज्ञाही एका पत्रांत व्यक्त केली होती. 'नांगऱ्या'शीं विवाहबद्ध झाल्याबद्दल आरंभीं त्यानें तिची कींव केली होती, पण नीटपणें न जुळल्यास बेधडक काडीमोड करण्याचाही त्यानें तिला सल्ला सुचविला होता. यांत पातक अथवा अयोग्य असें कांहींच नाहीं. तशांत रजिस्टर विवाह झाला, हें एकपरी बरेंच झालें. कारण त्यामुळें काडीमोडीच्या सवलतींचा फायदा घ्यायला सवड राहिली. आपल्या जोडीदाराशीं शक्यतांपर्यंत जुळवून घेण्याचा प्रयत्न करणें चांगलें, नाहींतर ज्याच्याशीं संसार करणें योग्य वाटेल त्याच्याशीं तो करणें, अथवा अविवाहित राहूनही समाज कार्य करणें चांगलें. अशा प्रकारचा वरून अतिशय उदात्त दिसणारा त्याचा उपदेश शैलाला निर्हेतुकपणाचा वाटला असला तर त्यांत नवल नाहीं.

धाकजीच्या घरीं आल्यानंतर तिला समजून आलें, कीं धाकजीची स्त्री खरोखरच सुंदर होती. ती मेली नसून दारूच्या निशेंत धाकजीनें अचानक मारलेली लाथ वर्मी लागून ती निश्चेष्ट झाली होती. हलधरनें अथवा कोणींही पाठविलेलें अन्न ती प्रथम आपल्या मुलाला घाली आणि उरलें तर आपण खाई, नाहींतर उपाशी राही. कामाला जाववलें, तरच तिला पोटाला थोडेंसें मिळे, नाहींतर उपासमार काढण्याची पाळी तिच्यावर येई. शैलानें तिला ओझरतीशी पाहिली. ती खरोखरच देखणी होती.

धाकजीचा मुलगा प्रथम कोणालाच दिसला नव्हता. बाप दारू पिऊन आलेला पाहिला, कीं तो कोठेंतरी घरांत दडून बसे. आज धाकजीचा उग्र अवतार पाहून तो बिचारा खबदडींत लपून बसला होता. बाप घरांतून निघून गेल्यानंतर तो बाहेर आला आणि आईला हाका मारून रडूं लागला. त्यांच्या रडण्यामुळेंच त्याची आई प्रथम भानावर आली होती. पण अशक्तपणामुळें पुन्हा बेसावध झाली होती.

शैलानें तिला आपल्या घरीं आणून पोचवायला तेथल्या लोकांना सांगितलें. माहेरघरीं ऐकलेल्या हलधरच्या निंदाव्यंजक व शेखरच्या स्तुतिपूर्ण गोष्टींनीं शैलाच्या मनःकासारावर असंख्य ऊर्मी उठल्या होत्या. आपण कांहींतरी आपल्या नुकसानीचें काम स्वतःच्या हातांनींच करून आलों अशी अर्धवट जाणीवही तिला टोंचत राहिली होती.

इतक्या सगळ्या गोष्टि मनोभूमिकेवर थैमान घालीत असतांनाही रस्त्यावर पोचल्यानंतर प्रसंगोचित कर्तव्यांत व्यग्र होणें तिला भागच झालें. धाकजीला मोटारींत घालून शैला व हलधर घरीं आलीं. नंतर हलधर मोटार घेऊन डॉक्टरला आणायला म्हणून गेला. मागाहून शैलाजवळ कोणीसें बोललें, कीं धाकजींच्या बायकोला मोटारींत घालून हलधरनें दवाखान्यांत पोचवलें.



प्रकरण बारावें

# पाहुण्यांच्या आग्रहासाठीं चुंबनें !

धाकजीच्या मस्तकाला दगड लागल्यामुळें त्याला जखमही झाली होती हें त्याला घरीं नेल्यानंतर लक्षांत आलें. त्याच्या लांब वाढलेल्या केसांतील ती जखम त्याला पाण्यांतून बाहेर काढल्यानंतर बराच वेळ कोणाच्या लक्षांत आली नव्हती. पण नंतर ती उघडकीस आली.

धाकजीच्या शुश्रुषेस हलधरच्या आश्रयास असलेले खेडूत होते. त्यांच्या शुश्रुषेचा व त्यांच्या विचारांचा परिणाम धाकजीच्या मनावर पगडा बसवूं लागला. दोन तीन दिवसांत तो साधारण बरा झाला, पण त्याला बाहेर हिंडाफिरायला डॉक्टरनीं परवानगी दिली नव्हती.

दोन तीन दिवसांत औद्योगिक पाहाणी करणारी समिति आल्यामुळें हलधर त्यांच्याबरोबरच नेहमीं राही. दिवसांतून एकदां तरी तो धाकजीस पाहून गेल्याशिवाय झोपत नसे. समितीचे लोक आल्यापासून हलधरच्या घराचें आवार म्हणजे एक छोटेंसें शेतकी प्रदर्शनच झालें होतें. त्या ठिकाणीं बाहेरून अनेक प्रकारचे व पेशाचे लहानथोर लोक सारखे येत जात राहिले होते.

कोंकणच्या जमिनीचे निरनिराळे नमुने, झाडें, फळें, फुलें, धान्यें व त्यांपासून बनवलेले हरेक तऱ्हेचे शोभेचे व उपयोगाचे जिन्नस हलधरनें जमविले होते व त्यांची माहिती एकत्रित केली होती. ते धंदे मोठ्या प्रमाणावर वाढविण्याची शक्यता आणि मार्गांतील अडचणी यांचीही नोंद त्यानें आपल्या मतानुसार केली होती.

शेतकऱ्यांचा शहरांकडे वळणारा ओघ शेतीवर राहाणें इष्ट असलें, तरी शक्य कसें नाहीं हें त्यानें समितीला सोदाहरण दाखवून दिलें होतें व समितीच्या सभासदांस सबंध गांवांत फिरवून शेतकऱ्यांचा जीवनक्रम दाखवून दिला होता.

या समितीचा मुक्काम हलधरच्या घरीं चार दिवस होता. एके दिवशीं सकाळीं आठ साडे आठ वाजतां गांवच्या जमिनीची व पिकांची पाहाणी करीत असतां हे सभासद अचानकपणें गांवाच्या मध्यवर्ती भागांत असलेल्या चहाच्या हॉटेलांत आले. त्या

हॉटेलांत प्रवेश करायच्या आधींच मेरीवेदरसाहेबांनीं त्या हॉटेलचा आंतील लोकांसह फोटोग्राफ घेण्यांत कसूर केली नव्हती.

त्यानंतर ते हॉटेलांत जाऊन उभे राहिले. त्या ठिकाणीं सात आठ शेतकरी व तीन चार कामकरी लोक जमले होते. त्यांत सर्व वयाचे लोक होते. म्हातारे, तरुण ज्वान, तसेच मुलगेही होते. दुकानांत एका बाजूस ऊस व दुसऱ्या एका कोपऱ्यांत मिरच्या ठेवल्या होत्या. काजू, कैऱ्या, फणसाच्या कुयऱ्या वगैरे जिन्नस देखील तेथें होते. त्या सर्व वस्तूंकडे हलधरनें सभासदांचें लक्ष मुद्दाम वेधून घेतलें. असाच कांहींसा प्रकार त्यांनीं दारू दुकानांतही पाहिला होता पण इतक्या मोठ्या प्रमाणांत नाहीं. नारळ आणि सुपारी, लाकडांचे भारे, तांदूळ आणि भात यांच्याही राशी जमिनीवर दिसत होत्या.

दुकान लहानसेंच होतें. एका बाकावर काचेचे डबे असून त्यांत मळकट पांढऱ्या व मळकट पिवळ्या रंगाचीं बिस्किटें होतीं, तशींच भजीं, चिवडा आणि पिठाचे लाडू करून ठेवलेले होते. त्यांतील कांहीं जिनसांवर बुरशी आली होती. चहा करण्याची, गाळण्याची पद्धत, गाळण्याचें तें काळेंकुट्ट गलिच्छ मळकट फडकें आणि कांठ फुटके व बिनकानाचे कप आणि अंतर्बाह्य घाणेरड्या बशा वगैरे साहित्य त्यांनीं पाहून ठेवलें. दुधाचा नाममात्र स्पर्श झालेलें तें चहाचें विडंबन पाहिल्यावर मेरीवेदरसाहेबांना अचंबा वाटला. दुसरे प्रोफेसरसभासद जरी या गोष्टीस फारसे अपरिचित नव्हते, तरी इतकें खोल निरीक्षण त्यांनीं यापूर्वी केलें नव्हतें.

आठ नऊ वाजेपर्यंत चहाच्या दुकानांत बसलेले शेतकरी चहापान उरकल्यानंतर शेतावर कसे जातात व नंतर कितीसा वेळ शेतावर काम करीत असतात, हें चहाचें व कित्येक जण तर दारूचें बिल भागविण्यास असमर्थ असल्यामुळें ते कर्जबाजारी कसे बनतात, तें दुकानदाराचें कर्ज फेडण्याकरितां त्यांना आपल्या शेतमळ्यांतल्या वस्तु जास्त किंमतीच्या असून उधारीनें मिंधे झाल्यामुळें अथवा हिशेब कळण्याचें ज्ञान नसल्यामुळें कमी किंमतीस देणें कसें भाग पडतें, ज्यांचा स्वतःचा मळा नसतो ते चहाबाज लोक दुसऱ्याच्या मालाची चोरी करून तो चोरीचा माल दुकानदारास देऊन चहाची तलफ कशी भागवितात, अशा प्रकारामुळें गांवांत चोऱ्यांचा सुळसुळाट व पोखरलेल्या शरीरामुळें रोगराईचा प्रसार कसा कायम टिकून राहतो, डोंगरांतील लाकडें घरांत सैंपाकास नसलीं तरी चहाच्या पेल्याकरितां हॉटेलच्या मालकाकडे कशीं पोचविलीं जातात आणि नवीन झाडें उठविण्याची यत्किंचित्‌देखील दरकार न करितां जुनीं झाडें मात्र कशीं

तोडलीं जातात व डोंगरमाथे उघडे बोडके कसे गांवोगांव पडत चालले आहेत, इत्यादि बाबींचा खुलासा प्रत्यक्ष प्रमाणें दाखवून हलधरनें समितीच्या सभासदांस करून दिला.

जमिनीचा एकक्षेत्रीपणा मोडून हिस्सेरशीच्या प्रमाणांत अनेक भागीदारांच्या मालकीचे झालेले असंख्य तुकडे ही पद्धत कोंकणभूमीच्या उन्नतीच्या मार्गातील एक दुर्लंघ्य संकट आहे हें सर्वांच्या परिचयाचें आहे. पण हलधरनें या बाबतींत एक निराळ्याच तऱ्हेचें उदाहरण दाखवून दिलें. त्याच गांवांतील एका वाड्यांत जमिनी समाईक म्हणजे तुकडे झाल्याशिवाय आणि कुळेंही सर्व भागीदारांचीं तींच होतीं. अशा परिस्थितींत धन्यांमध्यें जर सलोखा आणि सहकारिता असेल, तर कुळांना खर्चाला पैसे देऊन जमिनींत सामायिक तत्त्वावर लागवड करून, उत्पन्न देखील हिस्सेरशीच्या प्रमाणांत विभागून घेतां येणें शक्य आहे. पण ही गोष्ट कधींच घडत नाहीं. कारण जमिनी समाईक असल्यामुळें आपल्या एकट्याचेंच काय नडलें आहे उत्पन्न वाढवायची जोखीमदारी आंगावर घ्यायला ? अशा कोत्या विचारानें धनी लक्ष घालीत नाहीं आणि धनी बेफिकीर म्हणून व कबुलायती एकसाली म्हणून जमिनीच्या कसवटीसाठीं कुळें निष्काळजी. यामुळें जमिनी समाईक, एकक्षेत्री असूनही सहकारितेच्या अभावीं त्या दिवसेंदिवस निकस बनत चालल्या असल्याचा देखावा हलधरनें आपल्या पाहुण्यांस दाखवून दिला. त्यांतच पोटापाण्यासाठीं बाहेर शहरीं राहात असलेल्या खातेदाराची जमीन, गांवांत खात्याची वहिवाट करीत राहिलेला त्याचाच समाईक भागीदार, कुळास सामील करून घेऊन, नवीन कुंपणें घालून, जमीन चालू वहिवाटीनें कशी बळकावतो व नंतर कज्जेदलाली कशी वाढते, याविषयींचे नमुने हलधरनें दाखवून दिले,

शेतकऱ्यांकरितां व कामकऱ्यांकरितां सरकार कायदे करील, कर्जनिवारणाची, सारातहकुबीची अगर सूट देण्याची योजना आंखील; पण शेतकऱ्यांची व्यसनमुक्तता आणि त्यांच्यांत ज्ञानप्रसार झाल्यावांचून त्या योजनांचा व्हावयाचा तो टिकाऊ परिणाम दिसून येणार नाहीं हें सत्य हलधरनें समितीच्या सभासदांच्या मनावर चांगलेंच बिंबवून दिलें.

कर्जनिवारणाची योजना करणें म्हणजे सावकारवर्गास मूठमाती देणें नव्हे. कमी व्याज आकारावयास लावावें, पण कर्जाची फेड योग्य मुदतींत होईल असें करणें हें अधिक न्यायाचें होईल.

जमिनी ज्यास्त मुदतीच्या करारानें भागेलपणास द्यावयाचा कायदा करावा पण

जमिनींत जास्त उत्पन्न येण्याकरितां कसवट करणाऱ्या भागेल्यास व जमिनीवर खर्च करणाऱ्या व सरकारसारा भरणाऱ्या खातेदारास उत्पन्नाचा योग्य हिस्सा योग्य मुदतींत मिळत आहे कीं नाहीं हें पाहाणें देखील अशा प्रकारचा कायदा करणाऱ्या निःपक्षपाती सरकारचें कर्तव्य आहे; तिकडे डोळेझांक होऊं देतां कामा नये.

कोंकणांत कल्पकता आहे, बुद्धि आहे, श्रम करणारे लोक आहेत, पण धंदे ऊर्जितावस्थेस येत नाहींत याचें कारण भांडवलाचा अभाव. या बाबीचीही नोंद करण्यांत आली.

गांवांतील पाटपाण्याच्या व मानपानाच्या बाबतींतील तंटे, उत्पन्नाच्या नवीन बाबी शोधून काढण्याचा आळस, आपल्यापेक्षां वरच्या दर्जाच्या लोकांचें अनुकरण करून वाजवीहून फाजील चैनीच्या गरजा वाढविणें, आपली स्थिति खरोखरी असेल त्याहून जास्त आहे असें समाजांत दाखविण्याची अनिवार इच्छा, इत्यादि घातुक सामाजिक प्रवृत्तींचा उल्लेख हलधरनें केला.

चार दिवस समितीचें पाहाणीचें काम झाल्यावर इतर सभासद निघून गेले. पण फक्त मेरीवेदर दांपत्य हलधरचा पाहुणचार घ्यायला हलधरच्या आग्रहावरून राहिलें. मेरीवेदरसाहेबांना हलधरच्या खोल व्यासंगाचें अतिशय आश्चर्य वाटत होतें.

मेरीवेदर दांपत्याला हिंदु संस्कृतीची शक्य तितकी खाजगी व खरीखुरी माहिती मिळवायची होती. हिंदूंचें खाणेंपिणें, कपडेलत्ते, देवदेवता, घरांतली राहाणी व स्वयंपाकपद्धति, रीतिरिवाज, धार्मिक व सामाजिक आचारविचार आणि व्रतेंवैकल्यें वगैरे मिळेल तितक्या विषयांची माहिती घ्यायची होती. त्यांचा हा व्यासंगच होता. मराठी भाषेचा कामापुरता अभ्यास त्यांनी प्रथम हलधरकडेच केला होता. त्यानंतर त्यांनीं एक शिक्षकच ठेवला. पण त्यांना आढळून आलें कीं, मराठीचा खरोखरच चांगला पायासूद अभ्यास करायचा तर संस्कृतची ओळख करून घेतली पाहिजे. म्हणून त्यांनीं शास्त्री ठेवून तोही अभ्यास केला.

कोणत्याही भाषेचें लिखित वाचण्याचें ज्ञान पुस्तकावरून होऊं शकतें. पण उच्चार, बोलणें व खऱ्या खुब्या ती भाषा बोलणाऱ्यांच्या समाजांत मिसळून, घरांत राहून वागल्याशिवाय कळत नसतात. मेरीवेदरसाहेब आपल्याला मराठी भाषेचें ज्ञान असल्याचें जेव्हां दर्शवीत, तेव्हां इंग्रज समाजांत त्यांचें मोठें कौतुक केलें जाई, पण मराठी समाजांत त्यांचें हसें होई. तें हसें जरी कितीही दाबण्याचा प्रयत्न केला तरी चाणाक्ष मेरीवेदर-

साहेबांच्या तें कधीं कधीं लक्षांत आल्याशिवाय राहात नसे. त्यांना हलधरच्या कुटुंबांत थोडे दिवस तरी राहाण्याची इच्छा होती. सौ. मेरीवेदर यांना हिंदूंसारखी साडी नेसायला शिकण्याची व हिंदूंच्या स्वैंपाकपद्धति व पक्वान्नें यांची माहिती घेण्याची अतिशय चुटपुट लागून राहिली होती. आपल्या खाण्यापिण्याची माहिती घरोब्यादाखल शिकवायची त्यांची तयारी होती.

त्यांनीं जेवणाचा बेत एक दिवस युरोपियन पद्धतीप्रमाणें, तर एक दिवस मराठी पद्धतीप्रमाणें असा चालविला होता. युरोपियन पद्धतीचे कांहीं जिन्नस अर्थातच शैलाला आवडत नसत. हलधरला आवडले नाहींत तरी तो ते खाण्याचा प्रयत्न करी. मराठी स्वैंपाकाच्या बाबतींत पाहुण्यांचीही केव्हां केव्हां तशीच गत होई. हलधरनें पाहुण्यांच्या साठीं युरोपियन लोकांकडे राहिलेला असा एक चांगला बबर्जी पैदा केला होता व एक मराठी आचारीही आणला होता.

एके दिवशीं युरोपियन जेवणांत पुढील जिन्नस केले होतेः—

Lunch—Mutton broth, Mince stew with rice
Pudding–Fresh fruit salad with custard
Dinner—Jug Soup, Potato chops with salad and vegetable, Brown gravy stew with a lot of vegetable;
Pudding—Steam chocolate with custard.

तर मराठी जेवणाचें ताट पुढील जिनसांनीं सजविलेलें होतेंः—

भात, वरण, हरभऱ्यांच्या डाळीची आमटी, बटाट्यांचा रस्सा, तळलेले कालव, वालींची भाजी, मेथीची पातळ भाजी, कैरीचें ताजें फोडणीचें लोणचें, सांडगे, पापड, पावट्यांची उसळ, शिकरणपुरी, चपाती, चक्का दहीं, ताकाची कढी.

मराठी जेवणांतील जिन्नस खातांना गोऱ्या पाहुण्यांची जी तारांबळ उडे आणि त्यांचे कपडेही जेव्हां रंगूं लागत, तेव्हां हसतां हसतां पुरे जन्म होत असे. विशेषतः लोणचें अगर सांडगे खाणें पाहुण्यांना मुळींच आवडत नसे.

एखादे वेळीं मराठी जिन्नस युरोपियन पद्धतीनें करण्याची संमिश्र टूम काढण्यांत येई. उदाहरणार्थ—Wet kitcherie and mutton curry.

अर्थात् जेवणाच्या वेळीं वादविवाद खूप रंगांत येई, तेव्हां पुष्कळ हास्यविनोद पिके. कधीं कधीं कडाक्याचा वादविवाद माजे.

हलधरच्या घरीं आल्यापासून हिंदु पद्धतीची केशरचना आणि कपडे वापरण्याची हौस मिसेस मेरीवेदर मनमुराद पुरवून घेत होत्या. त्यांना चालतांना चप्पल वापरणें आवडत असे. पण तसें केल्यास पावलांवर अनिष्ट परिणाम होईल व युरोपियन समाजांतील माणसें हसतील म्हणून त्या तसें करीत नसत.

मि. मेरीवेदरसाहेबांचें नांव हॅरिसन् ऊर्फ हॅरी असें होतें. हलधर त्यांना हरिभाऊ म्हणत असे. उलट पक्षीं मिस्टर मेरीवेदर हलधरला 'हॅलॅदार' म्हणून हाक मारीत असत.

हलधरच्या बागेंत फिरत असतां हळदीचे वाफे सुकून गेलेले त्यांना दिसले. हळद खणून काढायची राहिली होती. त्या हळदीचा रोपा, तिचा उपयोग वगैरे समजावून देत असतां त्यानें एक रोपा खणून व त्याचा तो छोटा गड्डा नखांनीं खरचटून दाखविला. त्या हळदीच्या नांवाचें इंग्रजी स्पेलिंग halad असें जेव्हां लिहून दाखविलें, तेव्हां हलधरचा हात ओढून घेऊन मि. हरिभाऊंनीं जोराची टाळी दिली.

" ओ ! आय् सी ! " हरिभाऊ कसला तरी मोठा शोध लावल्याच्या आविर्भावानें म्हणाले, " टुमि हाय घेट्ला या वस्टूचा नाम ! कारन की, टुमचा रंग हाय या वस्टूच्या रंगासारखा. टुमि हॅलॅड्, आनि हा वस्टू हॅलॅड् . असा टुमि हॅलॅड् ! आता आमि टुमाला बोलनार हॅलॅड् ! येस ! हॅलॅड् ! "

हरिभाऊंचें हें व्युत्पत्तिशास्त्र ऐकून हलधरला कमालीची गंमत वाटली. शेवटीं त्यानें हलधर शब्दाची खरी व्युत्पत्ति व अर्थ समजावून सांगितला.

पण गोऱ्या हरिभाऊंना " हळद " असा उच्चार करतांच येईना. शेवटीं त्यांचा उच्चार सुधारण्याचा यत्न हलधरला सोडून द्यावा लागला.

" आमच्यांतील लहान वयाचीं बोबडं बोलणारीं मुलं जितक्या वर्णाक्षरांत आपली भाषेची गरज भागवतात, तितक्यांतच तुम्ही युरोपियन मंडळी आपल्या लिपीचे वर्ण भागवतां. त्यामुळें तुम्हांला आमच्या शब्दांचे उच्चार कधींही करतां येणार नाहींत " असा शेरा हलधरनें निराशेनें मारला.

" पण आमची भाषा साऱ्या जगावर पसरली आहे " गोरे हरिभाऊ ऐटीनें म्हणाले.

शैला घरकामांत निमग्न होती.

मिसेस ल्युसी हॅरिसन ही देखील बबर्जीस कांहीं सूचना देत होती. आज शैलानें ल्युसीकरितां एक व आपल्याकरितां एक अशा दोन शेवंतीच्या वेण्या बनविल्या होत्या

व त्यांत मालीचीं केसरें (मंजिऱ्या) गुंफल्या होत्या. ती सुगंधित वेणी घालून ल्युसीबाई इकडून तिकडे मिरवत होत्या. पण त्यांनीं या चालू संभाषणांत भाग घेतला नव्हता.

" जगभर तुमची भाषा पसरली असली तरी ती वर्णसदृश नाहीं. उच्चार आणि स्पेलिंग या बाबतींत त्या भाषेंतले दोष तुम्हांला नाकबूल करतां येणार नाहींत. उगीच बढाई कशाला मारतां ? " हलधर म्हणाला.

" उगीच नांवं कशाला ठेवतां आमच्या भाषेला ? " हरिभाऊ आपल्या बोबड्या मराठींत बोलत होते, " तुम्हांला आमची इंग्रजी भाषा शिकल्याशिवाय चालेल काय ? सांगा. आमची इंग्रजी भाषा आम्ही साऱ्या जगाची भाषा करणार. "

" तुमच्या भाषेंत जें ज्ञानभांडार सांठलं आहे, जें वाङ्मय भरभराटलं आहे, तें मिळवण्याकरितां आमच्यांतील कांहीं लोक यापुढें इंग्रजी भाषा स्वेच्छेनें शिकतील. पण नोकरीच्या इच्छेनें तुम्ही सर्वांना बळजबरीनें इंग्रजी शिकायला भाग पाडूं शकणार नाहीं. आम्ही आमची शिक्षणपद्धति सगळी बदलून नवीन तऱ्हेची आरंभीत आहोंत. इंग्रजीला भलता मोठेपणा मिरवूं देणार नाहीं. जेतेपणाच्या जोरावर तुम्हीं आम्हांला आजवर हवं तसं नाचवलंत. आतां तसले नाच आम्ही यापुढें चालूं देणार नाहीं, समजलांत ?" हलधरनें म्हटलें.

दोघांनींही खाकी रंगाच्या अर्ध्या विजारी पायांत घातल्या होत्या. आंगांत शर्टस् व कोट आणि डोकीस हॅट्स् होत्या. मात्र हलधरच्या पायांत बुटांऐवजीं वहाणा होत्या.

उजवा पाय आपटून हरिभाऊनीं विचारलें,

" तर मग काय तुम्ही आम्हांला हाकून देणार ? "

" मुळींच नाहीं. आमच्या देशाला विघातक असं तुमचं वर्तन जोंपर्यंत असणार नाहीं, तोंपर्यंत आम्ही तुम्हांला हाकून देणार नाहीं आणि सध्यांतर तुम्हांला हाकून देण्याइतकी ताकदही आमच्या आंगांत नाहीं. पण आपण दोघे एकमेकांचे मित्र राहाण्यांतच आपलं दोघांचेंही हित आहे. " हलधर सौम्यपणें बोलत होता.

त्यांचें हें बोलणें चाललें असतांनाच तेथें शेतकरी लोक जमले. शेतकरी जीवनाच्या प्रात्यक्षिकाचा एक कार्यक्रम आज ठेवण्यांत आला होता.

चाळीस पन्नास वर्षांपूर्वीचें शेतकरीजीवन व हल्लीचें शेतकरीजीवन यांची तुलना दाखविणारा तो कार्यक्रम होता.

शेतकऱ्याचें पहांटे उठणें, न्याहारीची भाकरी भाजी अथवा पेज, दुपारचें जेवण, रात्रीचें जेवण, त्याचे कपडे, त्याची आउतें, त्याच्या सवयी, त्याच्या करमणुकीचीं साधनें व हल्लींच्या शेतकऱ्याचें उशिरां उठणें, शेतीकडे दुर्लक्ष, चैनीच्या सवयी, व्यसनाधीनता इत्यादि गोष्टींची कल्पना हरिभाऊंना देण्यांत येणार होती.

हल्लींच्या जीवनांत शास्त्रीयता, आरोग्यज्ञान, स्वच्छतेचें महत्त्व, यांत्रिक सोयी इत्यादि गोष्टी उपलब्ध झाल्या असल्या तरी आपल्या देशांतील विशिष्ट हवामानाला न मानवणाऱ्या खाण्यापिण्याच्या व पोषाखादिकांच्या अनुकरणानें आपलें कसें नुकसान होत आहे, हें शेतकऱ्यांस समजावून देण्यांत आलें. सबंध दिवस अशा प्रकारच्या कामांत केव्हांच्या केव्हांच गेला.

रात्रीं पाहुण्यांचें व यजमानांचें एकत्र भोजन व गप्पासप्पा सपत्नीक व्हायचें ठरलें होतें.

संध्याकाळच्या सुमारास बुट्टोजीनें हलधरला कांहीं तरी कानांत सांगितलें असावें. बहुधा धाकजीनें नदींत उडी टाकली त्या रात्रीं शैला माहेरीं गेली होती व त्या रात्रीं तेथें तिनें कसल्यातरी कागदावर सही केली अशा तऱ्हेचा तो मजकूर होता.

" हो ! मला तें कळलं आहे थोडंसं " हलधर हलक्या आवाजांत म्हणाला, " डॉक्टरांनीं मला सांगितलं. शैलानें मला विचारल्याशिवाय तिकडे जायचं नव्हतं. पण तिच जर आपमतलबीपणानें वागते, तर करायचं काय असल्या माणसाला ? "

हें त्यांचें बोलणें दिवेलावणीच्या वेळीं चाललें असतां त्या वाटेनें घराच्या मागील बाजूस काळोखांतून शैला चालली होती, तिच्या कानीं तें आलें. तिला तें ऐकून राग आला. बोलणारांना तिची चाहूल प्रथम लागली नव्हती. मागाहून तिची आकृति त्यांना दिसली.

" तो म्हणे डिस्चार्ज पेपर होता विमाकंपनीकडून आलेला. " बुट्टोजी बोलत होता, " भय्यासाहेबांनीं दहा हजारांचा विमा आपल्या पहिल्या बायकोच्या नांवें उतरला होता."

" होय आणि शैलाच आतां खरी वारस होती त्या मॅच्युअर झालेल्या पॉलिसीची पण तिनें हातीं आलेली लक्ष्मी गमावली. मर्जी तिची. अरेपण हो !..."

असें म्हणून हलधरनें आपल्या कोटाच्या खिशांत हात घातला. चुरगळून गेलेला कागद त्यानें बाहेर काढला.

" डॉक्टर धाकजीला बघून गेले का ? "

" होय "

" त्यांना दाखवायला मी एक कागद ठेवला होता."

" मी दाखवीन, द्या माझ्याकडे."

" नाहीं ! मीच दाखवीन उद्यां." हलधरनें म्हटलें. आपल्याहातीं लागला तो कागद तोच कीं काय म्हणून खात्री करण्याकरितां तो त्यानें इलेक्ट्रिक टॉर्चच्या उजेडांत धरला.

मोठ्या टाइपांत त्याच्यावरील "×××inol" हीं इंग्रजी अक्षरें दिसत होतीं. आणि त्याच्या मागचा भाग फाटून गेला होता. बाकीचा वारीक टाइपांतला मजकूर फाटून चुरगळून गेला होता. पण डॉक्टर त्या कागदावरील औषधाचें नांव ओळखल्या-शिवाय राहाणार नाहींत अशी त्याची खात्री होती. त्यांत कांहीं तरी मादक द्रव्य असलें पाहिजे अशी त्याला शंका आली होती.

त्या रात्रीं भय्यासाहेबांच्या घरीं व्हरांड्यावर काळोखांत जो कागदाचा कपटा उचलून हलधरनें खिशांत टाकला होता, तोच तो होता. पण त्यानंतर तो कोटाच्या खिशांत विस्मरणानें तसाच राहिला होता.

इकडे हलधर आणि बुट्टोजी बोलत उभे असतां तिकडे मि. व मिसेस मेरीवेदर दोघेंही बोलत बसलीं होतीं. त्यांचाही बोलण्याचा विषय शैला हाच होता. आदरातिथ्य करण्यांत, गृहकृत्यांत, वागणुकींत शैला ही फार चांगली मुलगी असल्याचा त्यांना अनुभव आला होता. हलधरच्या व्यवसायांत, गृहव्यवस्थेंत व त्याच्या आशा आकांक्षाच्या पूर्तिकरणांत शैलासारखी सद्गुणी व सुशिक्षित पत्नी हलधरला पूर्णपणें अनुरूप अशीच होती. पण त्या दोघांचें खरेंखुरें हृदयमीलन झालें असावें असें त्यांस वाटेना. त्यांच्यांत कांहींतरी तेढ वसत असावी असा त्यांनीं कयास बांधला व ती तेढ नाहींशी करून टाकण्याचा कांहींतरी गमतीचा प्रयोग करून पाहाण्याचा त्यांनीं घाट घातला.

रात्रीं जेवणें झालीं. आजच्या रात्रीच्या जेवणाला पंक्तीला, म्हणजे टेबलावर फक्त दोघें दांपत्येंच तेवढीं बसायचीं असें ठरलें होतें. मिस्टर मेरीवेदरनें हलधरकडे व ल्युसीनें शैलाकडे वैवाहिक जीवनासंबंधीं प्रश्न काढून खडा टाकून यापूर्वींच पाहिलें होतें. पण त्यांना कोणीच दाद दिली नव्हती.

जेवणानंतर गप्पासप्पांचा कार्यक्रम होता. मि. हॅरिसन प्रमाणांत मद्य घेत असत. पण हलधरनें त्यांना आपल्याकडे असेपर्यंत शक्य तर मद्य न घेण्याबद्दल विनंति केली होती व त्यांनींही ती आनंदानें पाळली होती.

भोजनोत्तर तांबूलभक्षण हा कार्यक्रम होता. हिंदु लोकांचा विडा ही काय चीज आहे तें पाहुणे दांपत्याला आमूलाग्र पाहावयाचें होतें. पाहुणे-दांपत्य तरुण व फार विनोदी होतें. त्यांनीं विडा कसा तयार करतात तें पाहिलें. ओठांना लाल रंग आणण्यासाठीं लिप्स्टिक् न लावतां तांबूलभक्षणानें तेंच कार्य हिंदी लोक घडवून आणतात कसें हें त्यांना आज सप्रयोग पाहावयाचें होतें.

"धाकजीची प्रकृति आणि मन दोन्हीही सुधारत आहेत." पाहुणे बोलतां बोलतां म्हणाले.

"होय. त्याला त्याचं शेत मीं लावणचिठीन कायम खंडानें द्यायचं कबूल केलं आहे. मात्र त्यानें त्यांत नवीन लागवड केली पाहिजे." हलधर म्हणाला.

"कसेल त्याची जमीन हें तत्त्व तुम्हांला एक फायदेशीर होईल, कारण तुम्ही स्वतः कसवट करूं शकतां. पण तुमचे इतर खातेदार गांवकरी हे नुसते खंड घेणारे आहेत, त्यांच्याकडे जमिनी कां म्हणून ठेवाव्यात ?"

"म्हणजे जमीनदारी नष्ट व्हावी असं तुम्हाला वाटतं काय ?"

"तसंच केवळ नाहीं. ह्या बाबतींत आपल्या महात्माजींचं मतच आम्हांला योग्य वाटतं."

असें हॅरिसनसाहेब म्हणत असतांच त्यांच्या पत्नीनें विडा त्यांच्या हातीं दिला. त्यांनीं तो तोंडांत टाकला.

मिसेस हॅरिसननें आपण विडा खाऊन शैलाला एक विडा हलधरला द्यायला सांगितलें.

शैलानें तबक पुढें केलें. त्याला प्रतिरोध करून शैलानें हातानें विडा हलधरच्या तोंडांत दिला पाहिजे असें ल्यूसीबाई सुचविण्याच्या बेतांत होती, पण तत्पूर्वींच हलधरनें विडा घेऊन तोंडांत टाकला. शैलानें स्वतः विडा घेतला. शैला त्यानंतर जाऊं पाहात होती, पण पाहुणे उठून झोपायला जायच्या आधीं ती गेली तर शिष्टाचाराचा भंग होत होता.

"माझा विडा रंगला का ?" हॅरिसन्नीं विचारलें.

हलधरनें होकार दिला.

"आज मी तुमचा पाव्हणा आहें. मी सांगेन तसं तुम्ही माझ्याकरितां केलं पाहिजे. कराल ना ?" हॅरिसननें हलधरला विचारलें.

हलधरनें होकार दिला.

" माझा विडा रंगला कीं नाहीं हें मी जसं पाहातों, तसं तुम्ही पाहिलं पाहिजे. " पाहुण्यांनीं अट घातली.

हलधर यजमान असल्यामुळें त्यानें पाहुण्यांची अट कबूल केली. कारण ल्यूसीबाईंनीं देखील त्याला तीच अट घातली.

" माझा विडा रंगला कीं नाहीं तें पाहातों हं ? " असें म्हणून हॅरिसनसाहेबांनीं ल्यूसीबाईंचा एक चांगला लांबलचक मुका घेऊन पुन्हा गालावर चुंबिलें आणि त्या दोघांही पाहुण्यांनीं तसें करावयाला हलधरला गळ घातली.

हलधर अनमान करूं लागला.

पाहुणीं आग्रहच करूं लागलीं.

हलधरनें शैलाकडे पाहिलें.

शैला त्याला अनुकूल दिसली नाहीं.

" कां ? ती तुझी बायको नाहीं कीं काय ? " असा थट्टेच्या भरांत हलधरला खाडकन् विचारला.

त्याबरोबर हलधर उठून शैलाचें चुंबन घेणार, तों ती निसटली.

पाहुणीं खदखदा हसलीं. त्यांनीं शैलाला पकडून चुंबन घेण्यास हलधरला सांगितलें.

तोंपर्यंत शैलानें उंबरठा ओलांडला होता. आपल्या मनाविरुद्ध हलधर वागतो ह्याचा तिला राग आला होता.

आपला अपमान होतो ह्याचा हलधरला राग आला होता.

हलधरनें तिला पकडून आपल्या बाहूंत घट्ट आवळून धरलें आणि एक सोडून अनेक मुके पटापट घेतले. तिला ओढून आंत नेण्यापेक्षां तेथल्या तेथेंच त्यानें चुंबनें घेतलीं, पण त्यांचा आवाज पाहुण्यांच्या कानांत जाईल एवढ्या मोठ्यानें घेतलीं.

पाहुण्यांनीं त्याला शाबासकी दिली.

शैला रागानें जळफळत, फणफणत आणि दूर गेल्यावर हातपाय आपटीत आपल्या खोलीकडे सरकली.

सकाळीं जाणाऱ्या पाहुण्यांस पोंचविण्याची तरतूद करून हलधर झोपायला जाईपर्यंत बरीच रात्र झाली होती.

प्रकरण तेरावें

# खरें स्वरूप

पाहुण्यांसाठीं द्यावयाच्या अनेक वस्तु हलधरनें जमवून ठेवल्या होत्या. मुरांबा, मोरावळा वगैरे खाद्य जिन्नस, तसेंच इतरही उपयुक्त आणि शोभेच्या वस्तु हॅरिसन दांपत्यास द्यावयाच्या त्या त्यानें व्यवस्थित बांधविल्या. पाहुण्यांना सावंतवाडीवरून बेळगांवला जायचें होतें, म्हणून त्यांना सावंतवाडीपर्यंत पोचवायला जायचें त्यानें ठरविलें.

सकाळींच उठून पाहुण्यांना चहा वगैरे देऊन स्वतःच्या मोटारींत त्यांना घेऊन तो कुडाळवरून सावंतवाडीला जायला निघाला.

तो पाहुण्यांचें आदरातिथ्य करीत होता खरा, पण रात्रीं घडलेल्या प्रकारामुळें त्याचें मनःस्वास्थ्य पार लोपून गेलें होतें.

पाहुण्यांना देखील घडलेल्या प्रकाराचें थोडेंबहुत अनुमान करतां आलें होतें. पण त्या बाबतींत आतां हलधरशीं त्यांनीं चकार शब्दही न काढण्याचें धोरण स्वीकारलें होतें. करायला जावें एक आणि होतें भलतेंच ! तशांतलाच तो प्रकार होता.

शैला रात्रभर झोपली नव्हती. शेखरचें आलेलें पत्र तिनें रात्रीं पुन्हा एकदा लक्षपूर्वक पाहिलें आणि तिनें आपल्या सामानाची आवराआवर केली.

पण सामानाची ट्रंक वगैरे तिला घ्यायचीच नव्हती. तिनें फक्त एका बॅगेंत राहातील तेवढ्या अत्यावश्यक तितक्याच वस्तु घेतल्या.

आधीं तिनें एक पत्र लिहिलें. त्या कागदांतच तिनें आपल्या गळ्यांतलें मंगळसूत्र काढून घातलें. नंतर तो कागद तिनें लिफाफ्यांत घातला. तो लिफाफा बंद करून तिनें तो हलधरच्या खोलींत त्याच्या टेबलावर नेऊन ठेवला. पत्रावर तिनें त्याचेंच नांव लिहिलें होतें.

सकाळीं उठल्यावर बाईंची नजर चुकवून ती घरांतून बाहेर पडली आणि मोटारच्या स्टँडवर गेली. मोटार अगदीं सुटण्याच्या तयारींत होती. कुडाळला गेल्यावर तिनें वेंगुर्ल्याचें तिकिट काढलें.

वेंगुर्ल्याला जाणाऱ्या मोटारींत बसतांना तिनें शेखरचें पत्र पुन्हा एकदा वाचून पाहिलें. हलधर सावंतवाडीहून घरीं येण्यापूर्वींच तिला वेंगुर्ल्याला पोचलें पाहिजे होतें.

ती वेंगुर्ल्याला पोचली तेव्हां उतारू लोक मुंबईस जाणाऱ्या बोटीची वाट पाहात तयारीनें राहिले होते.

बंदरावरील लक्ष्मीकांत हॉटेलांत ती शिरली. तिनें हॉटेलच्या मालकाजवळ शेखरची चौकशी केली. तो बाहेर गेला असल्याचें त्यानें सांगितलें. मात्र गेले दोन दिवस तो तिची वाट पाहात असून आजच गोव्याला जाणार आहे असेंही हॉटेलवाल्यानें सांगितलें.

हॉटेलवाल्यानें चहा आणला. शैलानें चहा पिण्याची आपल्याला सवय नाहीं असें सांगितलें व मालकानें दाखविलेल्या शेखरच्या खोलींत ती त्याची वाट पाहात बसली.

हलधर पाहुण्यांस बेळगांवच्या मोटारींत चढवून व आणखी एका दोघांस भेटून संध्याकाळीं घरीं आला, तों त्याला शैला घरांतून निघून गेल्याचें कळलें. त्यानें तिच्या खोलींत जाऊन पाहिलें. नंतर तो स्वतःच्या खोलींत गेला. तेथें त्याला स्वतःच्या नांवचें पत्र दिसलें.

पत्रांत कसली जड वस्तु आहे हें त्याला उमगेना. लिफाफा फोडल्यावर आईच्या आग्रहावरून शैलाच्या गळ्यांत आपण बांधलेलें मंगळसूत्र तिनें टाकून दिलेलें त्याला दिसलें. पत्र उघडून वाचायला त्याचे हात धजेनात. पण वाचल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

पत्रावरून त्यानें भर्रर्कन् नजर फिरविली. त्याची कंबर मोडल्यासारखीच झाली. पाय गळल्यासारखे होऊन तो पलंगावरच बसला.

विवाहाला तयार होतांना परस्परांनीं परस्परांस दिलेलें वचन हलधरनें मोडल्याचें त्यांत लिहिलें होतें. स्त्रीला तिच्या मनाविरुद्ध परक्यांदेखत दाबून धरून चुंबनें घेण्याचा रानटीपणा म्हणजे कमालीचा दोषास्पद ! त्याबद्दल त्याच्यावर तिनें यथेच्छ तोंडसुख घेतलें होतें.

त्यानें बाईंना भेटून त्यांचें समाधान केलें. बुट्टोजीला इतर व्यवस्थेबद्दल सूचना केल्या. औद्योगिक चौकशी समितीच्या मंडळीकडून त्याला सभासद व्हायला विनंती करण्यांत आली होती व मेरीवेदरसाहेबांनीं तर त्याला होय म्हणायला भागच पाडलें होतें. त्यानेंही आठ दिवसांत आपली लेखी संमति पाठवितों असें कळविलें होतें. पण आतां ?

आतां मुळीं जीविताविषयींच त्याला वैताग उत्पन्न झाला होता, तेथें समितीच्या सभासदत्वाची कसली पर्वा ? लागोपाठ जाऊन शैलाला गाठावें व तिचें मन वळवावें, असें त्याला वाटलें. पुन्हा त्याच्या मनांत विचार आला, कीं शैलाचें मन जर शेखरकडेच ओढ घेत असेल, तर त्याला आडकाठी करणें योग्य नव्हे. पण तशी आपली इच्छा तिनें स्पष्टपणें कां कळवूं नये ?

कसेंही असलें तरी बळजबरीनें चुंबनें घेण्याची जी आगळीक आपल्या हातून घडली तिचें खरें कारण तिला सांगून मोकळें झाल्याशिवाय मनाला स्वस्थता प्राप्त होणार नाहीं असें त्याला वाटलें. खरी हकिगत सांगितल्यानंतर तिचें समाधान होवो कीं न होवो, मग तिचा मार्ग तिला मोकळा आणि आपला आपल्याला.

असा विचार करून आपली स्वतःची मोटार न घेतां तोदेखील सर्व्हिसच्या मोटारीनेंच वेंगुर्ल्याला जायला निघाला. कुडाळला गेल्यानंतर शैला वेंगुर्ल्याला गेली असल्याची त्याला माहिती मिळाली होती.

आतां प्रथम बोट यायची ती मुंबईहून गोव्याकडे जाणारी पहाटेला. तीच बोट बारा वाजतां परतून वेंगुर्ल्याला येऊन मुंबईला जायला निघायची.

बंदरावर उतरल्यावर हलधरनें रस्त्यावरून चोहोंकडे पाहात एक खेप घातली. नंतर तेथील हॉटेलाजवळून निरीक्षण करीत तो फिरला. त्यानें कोणाकडे कसलीच चौकशी म्हणून केली नव्हती. त्याच्याबरोबरही कोणी मामुली प्रश्नापलीकडे फारसें कांहीं बोलला नाहीं.

त्याला भूक तहान नव्हती. कस्टम हाऊसच्या पाठीमागच्या वाटेनें गेलें असतां उजवीकडे जीं खडकें लागतात तिकडे त्याचे पाय वळले.

डावीकडच्या बाजूस बंदरांत तारवें ओरवा करून राहिलीं होतीं. त्यांच्यावर दिवे होते. वाऱ्यानें तीं गलबतें हालूं लागलीं, कीं वरील दिवे देखील वरखालीं होत असत. रात्रीच्या काळोखांत गलबतांची आकृति न दिसतां अधांतरीच हेलकावे घेणारे दिवे दिसले कीं मौज वाटे. पण हलधरला ते दिवे पाहून कांहींतरी निराळेंच वाटूं लागलें. संसारसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या जीवांच्या प्राणज्योति, समुद्राच्या उदरांत गडप व्हावें कीं आकाशाच्या आवारांत विलीन व्हावें, ह्या हिंदोळ्याच्या आंदोलनांत हेलकावे घेत आहेत कीं काय असा त्याला भास झाला. काळ्याकभिन्न अंधारांत देखील फॉस्फरसच्या मिश्रणामुळें समुद्रतरंगांच्या शिखरावरील चमकणारा फेस ह्या जर

आकाशांत तळपणाऱ्या विद्युल्लतेचा रस असता, तर संसाराला कंटाळलेल्या जीवाला गुडघाभरशा पाण्यांतच उपकारक ठरला असता ! ह्या विचाराच्या लाटेबरोबरच त्यानें आपले पाय समुद्राच्या पाण्यांत सोडले. त्या पांढऱ्या फेसाचें पाणी, चकाकणारें तें पाणी त्याच्या पायाला लागलें, पण व्यर्थ. पाण्यावरून येणाऱ्या झुळुकी थंड नव्हत्या. त्या उबाऱ्याच्या होत्या. पण त्यांत अग्निरसाची दाहक किंवा विद्युद्रसाची मारक शक्ति नव्हती. शीतलता तर मुळींच नव्हती. त्याचें मन तर अधिकच निराश झालें. शहरांतून बंदरावर येतांना त्याला एक डिटेक्टिव्ह् साध्या पोषाखांत फिरतांना दिसला होता. तो हलधरच्या ओळखीचा होता. हलधरकडे पाहून त्यानें थोडें स्मित केलें होतें. त्याच्याकडे हलधरची नजर जात असतांच हलधरची मोटार पुढें धावली होती.

आतांदेखील हलधरच्या डाव्या हाताकडील मोठ्या खडकाच्या बाजूस दोन तीन आकृति एकत्र जमून हलक्या आवाजांत कांहीं बोलत होत्या. समुद्राच्या लाटांच्या खळबळाटांत त्यांचें बोलणें ऐकूं येणें शक्य नव्हतें. त्यांच्यांपैकीं एक आकृति हलधरच्या पाठीमागें येऊन उभी राहिली तरी हलधरला त्याची दादच लागली नव्हती. तो आपल्याच तंद्रींत चूर होता. तो उठला आणि पुन्हा बंदरावरील हॉटेलांच्या बाजूस जाऊं लागला.

तो लक्ष्मीकांत हॉटेलच्या जवळ आला होता. मंडपांत उतारू माणसें अस्ताव्यस्तपणें निजलीं, बसलीं होतीं. पण हॉटेल-इमारतींतल्या एका खोलींतून दोघांच्या बोलण्याचा आवाज त्याला ऐकूं आला. तो ऐकून हलधर तेथेंच थबकला. हलधर प्रवासाच्या खाकी कपड्यांत होता. त्याच्या पाठीमागून एक खलाशी आला.

" खंयूच्या बोटीन जाताल्यात हो ? "

हलधरला त्याचा प्रश्न ऐकूंच आला नाहीं. आपल्याला हवा होता तोच ओळखीचा आवाज ऐकूं आला असें त्याला वाटलें होतें.

" तिकिट काडल्यात ? "

तरी हलधरचें लक्ष त्याच्याकडे जाईना.

" खंयूचे बोटीचां तिकिट काडताल्यात ? " त्या खलाश्यानें आतां हलधरच्या समोर उभा राहात विचारलें, " आज तीन आगबोटी आसत. वेगावती, रत्नागर आणि रामदास. तुमकां खंयूची होयी ? "

हलधर कांहींएक न बोलतां त्याच्याकडे नुसता टकमक बघतच राहिला. कारण त्याचे कान दुसरीकडे लागले होते.




शेखर खोलींतून बाहेर पडलेला त्याला दिसला.

" चाय घिताल्यात ? " हॉटेलांतल्या पोऱ्यानें पुढें येऊन विचारलें.

" मगे सांगतय हां. " हलधरनें नाइलाजानें खलाश्याला सांगितलें. त्याला कसेंही करून त्रास चुकवावयाचा होता. खलाश्याला त्रासिकपणें उत्तर देतांना झालेली हलधरची मुद्रा पाहून हॉटेलवाला पोऱ्या हलधरला गिऱ्हाईक बनवूं पाहात होता, तो मागें परतला. खलाश्यानें आणि पोऱ्यानें हलधरचा डोळा चुकवून, त्याचा स्क्रू ढिला असल्याच्या खुणा एकमेकांस केल्या आणि तें हसतच बाजूस सरकले.

आतां तर हलधरचे डोळे देखील हॉटेलइमारतीच्या खोलीकडे गुंतले होते. शेखर खोलींतून बाहेर पडलेला त्याला दिसला. त्याचा पोशाख ऐटबाज होता. पायांत सुरवार व आंगांत अलवार कोट होता. डोकीस मोतिया रंगाचा फेटा बांधला होता. पायांत पमृश् होता. आधींच तो मोहक चेहेऱ्याचा, ह्या पोषाखांत तो रंगभूमीवरील नटाप्रमाणें दिसत होता. वेंगुर्ल्यांत तो दोन दिवस राहिला होता. बंदरावरचे खलाशी व हॉटेलवाले त्याला ' सरदारसायब ' म्हणूनच ओळखीत व संबोधीत होते.

शेखर बाहेरून लवकरच परतला. त्याला पाहातांक्षणींच हलधर काळोखांत मागें सरकला, तो पुढें आलाच नव्हता. तो इतक्यांत लक्ष्मीकांत हॉटेलइमारतीच्या खोलींत शिरणार होता. त्या खोलींत शैला असणार ह्याबद्दल हलधरची खात्रीच होती. हलधरनें लक्ष्मीकांत हॉटेलच्या समोरच्या दुसऱ्या दुकानांत तशीच एक जागा घेतली होती. त्या खोलींतून तो बाहेर पडला. पण दुकानांतून बाहेर पडण्यापूर्वींच तो मागें आपल्या जागीं पुन्हा येऊन बसला. कारण शेखरला त्यानें पुन्हा लक्ष्मीकांत हॉटेलांत शिरतांना पाहिलें. तो टेहेळणी ठेवून राहिला होता.

एक तास झाला. हलधरला कंटाळा आला. त्यानें संध्याकाळचें जेवण घेतलें नव्हतें. आतां साडे दहा वाजून गेले होते. त्यानें पेलाभर दूध मागविलें.

ह्या उतारू लक्ष्मीकांत हॉटेलपाशीं घुटमळत असतां आपल्या दुग्धालयांत आला म्हणून दुकानदाराला बरें वाटलें होतें. दुकानदार फार बोलका होता. हलधरला खिडकींतून काळोखांत बसून टेहेळणी ठेवायची होती. त्याला झोप घ्यावयाची नव्हती. फक्त टेकायला कांहींतरी पाहिजे होतें. दुकानदारानें त्याला एक काथ्यागोणपाटाचा तक्क्या दिला होता. ' सरदार सायबा'ला त्यानें प्रथम आपल्याकडे बोलावलें होतें. नंतर त्याला दूध पाहिजे कीं काय म्हणून देखील विचारलें होतें. पण ' सरदारसायबा'नें तें नाकारलें होतें.

" तो सरदारसायब् कुठें चाललाय हो ? " हलधरनें दुकानदाराला विचारलें आणि विचारतांना एक आण्याचीं केळीं मागविलीं. दुकानदाराची स्वारी खूष झाली व त्यांचें भाषण सुरु झालें. कारण ह्यावेळीं आतां गिऱ्हाइकी नव्हतीच. दुकानदारालाही कोणीतरी बोलायला पाहिजे होता. पहाटेच्या गिऱ्हाइकीसाठीं लागणारें दूध त्याच्या गवळ्यानें अजून आणलें नव्हतें.

" तो सरदारसायब् असाच फाटका सरदार दिसतो. मात्र मिजासखोर दांडगा. काल त्यानें विलायती सायबासारखा पोशाख केला होता. आज जशी सरदारकी थाटली आहे, तशीच परवांचे दिवशीं थाटली होती. परवांचे दिवशीं त्यानें एका बाईमाणसाला आपल्या नोकराला बरोबर देऊन गोव्याला पाठवून दिलें. आज आणखी एक बाई कुठून तरी पैदा केलीच आहे त्यानें. पण आजच्या प्रकरणांत कांहींतरी घोटाळा दिसतो आहे..."

" तो कसा हो ? " हलधरनें आतुरतेनें विचारलें. तो नुसता हुंकार देत राहिला होता.

" हां, तें असं आहे, " एखादें गहन गूढ उकलण्याचा आव आणून दुकानदार म्हणाला, " अहो असलीं कुलंगडीं आम्हांला किती तरी बघायला मिळतात. तें तुमच्यासारख्यांना नाहींच कळायचं. खरंच, कुठले हो तुम्ही ? " दुकानदार गुप्त गोष्ट सांगायच्या पूर्वी आपण कोणाशीं बोलतों आहोंत हें जाणून घेण्याच्या उद्देशानें म्हणाला.

" म्हणजे ! तुम्ही मला ओळखत नाहीं ? दुकान कधीं घातलं इथें ? हल्लींच वाटतं ? "

" मला दोन महिनेच झाले दुकान उघडून इथें. मी कारवारकडचा. म्हणूनच इथले दुकानदार माझा द्वेष करितात. "

" मी मालवणकडचा. " हलधर म्हणाला.

" असं ? " दुकानदार बोलण्याच्या ओघांत आला होता, " तेव्हां तें असं आहे. परवांची ती बाई ह्या भंपकरावाला वश होती. पण आजचं हें प्रकरण त्याला वश झालेलं नाहीं. त्या बाईची गैरसमजूत करून फुसलावून आणलेली आहे. ही बाई सालस आणि सरळ स्वभावाची दिसते. अहो ती सकाळीं इकडे आली आहे. संध्याकाळीं ह्या भंपकरावनें एक मोटार आणली होती फिरायला जायला; पण ती आंत बसेना. ' मला

गोव्याला सृष्टिसौंदर्य पाहायला नेणार ना ? बस्स् ! गोव्यांत गेल्यावरच मी फिरायचं वगैरे ठरवीन ' असं तिनें निक्षून सांगितलं. हा भंपकराव अगदीं निराश झाला. दुसरं असं, कीं ही बाई दिसते घरती सारखी. पण गळ्यांत मंगळसूत्र नाहीं..."

" बरीच बारीक नजर आहे तुमची..." हलधर म्हणाला.

" अहो, मी दूधवाला दुकानदार असलों, तरी मला तशी पारख आहे हो ! " डोळे मिचकावीत दुकानदार म्हणाला, " ही बाई निराळ्या रंगाची असती, तर मी तिला माझ्या दुकानांत हरतऱ्हेनें खेचली असती. ती आल्यापासून त्या खोलींत पडून राहिली आहे. पण हें बघा..." दुकानदाराचा आवाज हळू झाला. त्यानें आजूबाजूस पाहिलें.

" कान करा इकडे..." दुकानदार पुटपुटून म्हणाला. त्यानें सांगितलेली गुप्त बातमी ऐकून हलधर स्तिमित झाला.

" काय, म्हणतां काय ? " त्यानें पराकाष्ठेच्या आश्चर्यानें विचारलें.

" काय नाहीं म्हणतां ? चला, पैज लावा. " दुकानदार आवेशानें म्हणाला.

" आतां बघा तो भंपकराव पुन्हा पोषाख बदलील. पण पोलीस त्याच्या पाळतीवर आहेत आणि ह्या मवाल्याच्या नादानें ती सालस बाई कचाट्यांत सापडणार कसल्या तरी. "

हलधरनें लक्ष्मीकांत हॉटेलकडे डोळे चोळून पाहिलें. हलधरसारखाच खाकी पोषाख केलेला तो तरुण होता.

" तो बघा, आलाच पोषाख बदलून भंपकराव सरदार. " दुकानदार म्हणाला.

शेखरच होता तो. एक गबाळ्या पोषाख केलेला उतार वयाचा ब्राह्मण लक्ष्मीकांत हॉटेलांत शिरला. पण त्यानें आंगावर ओव्हरकोट घेतला होता. असला विचित्र वेष बघून लोक त्याला हसत होते. तो ब्राह्मण चहा घेत असला तरी भंपकरावची नजर चुकवून त्याच्या हालचालीकडेच बघत राहिला होता.

" कुठें जायचं आहे हो तुम्हांला ? " त्या ब्राह्मणानें शेखरला विचारलें. शेखरनें तिकडे दुर्लक्ष केलें.

दुपारच्या बोटीनें त्याचा गोव्याला गेलेला माणूस परत यायचा तो आला नव्हता. तो मोटारनें कोठून तरी येईल म्हणून शेखर त्याची वाट पाहात राहिला होता.

शेखर बंदरावरील मोटारस्टँडकडे गेला.

" तो बघा, तो भंपकराव मोटार ठरवायला गेला आहे. त्यानें एक मोटार ठरविली होती. पण ठराव मोडला म्हणून एक ड्रायव्हर मला सांगत होता." दुकानदार हलधरला म्हणाला.

" पण तो गोव्याला चालला आहे ना ?" हलधरनें विचारलें.

" पण मला वाटतं आतां आज तो गोव्याच्या बोटीवर चढूं शकणार नाहीं. त्याच्या गळ्याभोवतालीं फास घट्ट बसत चालला आहे."

हलधर चट्दिशीं उठला आणि धावतच लक्ष्मीकांत हॉटेलकडे निघाला.

त्यानें आजूबाजूच्या लोकांना न जुमानतां शैलाची खोली गाठली. शैला स्वस्थ झोपली होती.

तिची ती निष्पाप सुषुप्तावस्था निरखून पाहून हलधर क्षणभरच तेथें राहिला आणि बाहेर गेला.

तो बाहेर गेला म्हणून बरें झालें. कारण शेखर जो धावतच खोलींत रिघला तो आपला थंडीचा लोकरीचा ओव्हरकोट पांघरण्यासाठीं म्हणून शैलाच्या आंगावर टाकून तडक चालता झाला.

शेखर मघाशीं बाहेर गेला असतां शैलानें अर्धवट झोपेंत असतां उठून शेखरनें झाकलेली खिडकी उघडी टाकली होती. ओव्हरकोट शैलाच्या आंगावर टाकीत असतां आपल्या खिशांतली कांहीं वस्तु काढून शेखरनें ती त्या ओव्हरकोटाच्या खिशांत टाकली होती. खिडकीबाहेरून हलधरनें आणि दुसऱ्या एका व्यक्तीनें तें न्याहाळलें होतें.

शेखर मोटारकडे गेला होता व तेथें ड्रायव्हरशीं कांहीं बोलत होता. ड्रायव्हरनें शेखरला स्पेशल मोटार द्यावयाचा करार करूनही पुढच्या बाजूस एक उतारू घेतला होता. त्यामुळें त्या दोघांची बोलाचाली झाली होती.

इकडे हलधर शैलाच्या खोलींत रिघून त्यानें तिच्या आंगावरचा ओव्हरकोट उचलून तो आपल्या आंगावर तो चढवणार होता. इतक्यांत शैलाला जाग आली.

त्याबरोबर हलधरने ओव्हरकोटाच्या खिशांतील हातरुमाल आपल्या खिशांत घातला आणि ओव्हरकोट त्यानें पुन्हा शैलाच्या आंगावर घातला.

पण शैला एकदम उठून बसली आणि ती रागावून हलधरकडे पाहूं लागली.

हलधरला तिच्याशीं बोलायलाच संधि पाहिजे होती. तेवढी त्याला सापडली तिचा तो उपयोग करून घेऊं लागला.

तिकडे शेखर आणि ड्रायव्हरचें लागलेलें झगडें थोडक्यांतच आवरलें. कारण शेखरला घाई असल्यामुळें ड्रायव्हरपुढें नमतें घेणें त्याला भाग पडलें.

ड्रायव्हरनें ठरलेली अट मोडली इतकेंच नव्हे तर शेखरला ज्याच्याविषयीं तिटकारा उत्पन्न झाला होता, असा उतारू गाडींत घेतला होता. वाटेल तितके जादा पैसे घे, पण त्या उतारूला घेऊं नको असें शेखरनें ड्रायव्हरला अनेक प्रकारें सांगून पाहिलें तरी ड्रायव्हर ऐकेना. तेव्हां नाइलाजानें शेखरला मोटारींत बसून जावें लागलें.

दुकानदार दुकानांतून दिसेल तितकी ह्या प्रकाराची गंमत बघत राहिला होता. त्याला महदाश्चार्य वाटत होतें तें इतकेंच, कीं ज्याच्याशीं आपण मनमोकळेपणें इतकें भारूड बोलून दाखविलें, तो शैलाच्याच खोलींत शिरून इतका वेळ काय करीत राहिला आहे!

पहिल्या तडाख्यालाच शैलानें हलधरची खूप निर्भत्सना केली होती. हलधरला जो उलगडा करावयाचा होता, तो त्यानें केल्यावर देखील तिचें समाधान झालें नव्हतें. आपण पत्र लिहून ठेवलें व सर्व खुलासा करून ठेवला असूनदेखील हलधरनें आपल्या पाठीमागून येण्याचा कोडगेपणा करावा, हें तिला बिलकूल सहन झालें नाहीं. त्यामुळें तिला आजवर कधीं आला नाहीं इतका विलक्षण संताप आला. मागें फिरण्याची आपली इच्छा नाहीं असें तिनें हलधरला निक्षून सांगितलें.

शैला पुन्हा डोक्यावरून पांघरूण घेऊन पडली.

हलधर मोटार-स्टँडकडे निघाला.

मघांचा दुकानदार हलधरला हाका मारून बोलावूं लागला. हलधरनें तिकडे दुर्लक्षच केलें.

हलधरनें एक स्पेशल मोटार ठरविली. त्याही मोटारींत एक माणूस ड्रायव्हरबरोबर पुढील बाजूस बसला होता. पण हलधरनें त्याला आक्षेप घेतला नाहीं. कुडाळांत थोडा वेळ राहून नंतर हलधरला आपल्या गांवीं जायचें होतें.

शैलानें डोक्यावरून पांघरूण घेतलें तरी तिला झोप कोठली यायला ? ती शेखरची वाट बघत होती. कांहीं वेळानें तिला गुंगी आली. लक्ष्मीकांत हॉटेलांत एक पोलीस बसून राहिला होता.

पहाट झाली. बंदरावरील घंटा वाजूं लागली. रत्नागर बोट येत असल्याची वर्दी लागली. जिकडे तिकडे गडबड सुरू झाली. तिकिट ऑफिस व चहाचीं दुकानें झांत

लोकांचीं गर्दी होऊं लागली. शैला जागी झाली. पण शेखर अद्यापही आला नव्हता. त्याची बॅगदेखील तेथें नव्हती. शैला उठून बाहेर आली. तिनें तोंड धुतलें. पेलाभर दूध मागवून ती प्याली.

शेखर कोठें गेला म्हणून तिनें मालकाला विचारलें. तो आतांपर्यंतचें बिल चुकतें करून व बोट येण्यापूर्वी येतों असें सांगून कसल्या तरी जरूरीच्या कामाला मोटारींतून घाईघाईनें निघून गेल्याचें तिला कळलें; ती मोठ्या विवंचनेंत पडली.

चौकशीकरतां तिला समजलें, कीं तो मोटारींतून आल्या वाटेनेंच निघून गेला.

शेवटीं एक माणूस तिच्या समोर आला. ह्याच माणसाला मोटारींतून बंदरावर येतांना हलधरनें ओझरता पाहिला होता. तो हलधरला ओळखीत असे. शैलाची स्थिति त्याच्यानें पाहावेना. एकंदर परिस्थिति आतां आटोक्यांत आल्यामुळें त्या माणसानें शैलाला सभोवतालच्या परिस्थितीची जरूरीपुरती जाणीव करून देण्याचें ठरविलें.

शैला भांबावून आपल्या खोलींत बसकण मारून बसली होती व तो माणूस बोलत होता. तें बोलणें ऐकत असतां शैलाला हलधरचें आणि शेखरचें खरें स्वरूप दिसून येत होतें.



प्रकरण चवदावें

# तारकेचें हास्य

शैलाबरोबर लक्ष्मीकांत हॉटेलच्या खोलींत बोलत बसणारा तो इसम शैलाला अपरिचित पण हलधरला ओळखणारा असा गुप्त पोलीस होता. शैला ही हलधरची कोणीतरी नातलग, कदाचित् भावी पत्नीही असेल अशी त्याला शंका आली होती.

त्यानें शेखर हा लफंगा व गुन्हेगार असल्याचें सांगितलें. कोल्हापूरला तो बँकेंत नोकरीला होता. दहा बारा दिवसांपूर्वी दहा हजार रुपये घेऊन तो कोल्हापूरहून फरारी झाला होता. आपला कोणाला सुगावा लागूं नये म्हणून त्यानें आपण हरिद्वारला जात असल्याचें कोल्हापूरच्या परिचित लोकांस सांगून ठेविलें होतें. पण तो मुंबईमार्गें वेंगुर्ल्याला उतरला होता. एकेक हजाराची एक अशा दहा नोटी त्यानें काढल्या होत्या. त्यांतील आठ नोटी मुंबईंत आणि एक नोट भद्राबाईबरोबर गोव्यांत जाणाऱ्या बोटीवर अशा पोलिसांनीं हस्तगत केल्या होत्या व शेवटची दहावी एक हजाराची नोट शेखरजवळ होती. ती त्यानें शैलाच्या आंगावर टाकलेल्या ओव्हरकोटांत होती. मुद्देमाल आपल्याजवळ ठेवायचा नाहीं एवढीच दक्षता त्यानें घेतली होती. शैला पकडली जावी पण आपण निसटावें अशीच शेखरची इच्छा होती. शेखरच्या हातांतील हिऱ्याची आंगठी शैलाला आतां आठवली.

शेखर वाटेंत पकडला गेला असून, त्याच्यावर खटला भरला जाईल हें त्या पोलीसाकडून शैलाला कळलें. पण हलधरला देखील थोडासा त्रास सोसावा लागेल असेंही तो म्हणाला.

"कां म्हणून?" डोळ्यांत पाणी आणून शैलानें गहिंवरून विचारलें.

"कां म्हणून म्हणजे? तुमच्यावरून. तुम्हाला जो त्रास होणार होता, तो त्या सद्गृहस्थानें आपल्यावर ओढून घेतला म्हणून."

"कसा?"

"खिशांत नोट असलेला तो ओव्हरकोट तुमच्या आंगावर असता, तर तुम्हांलाच तो त्रास झाला असता. पण त्या ओव्हरकोटांतला तो रेशमी हातरुमाल हलधरनीं काढून

घेऊन आपल्या खिशांत घातला. अर्थात एक पोलीस त्यांच्या मोटारींतून गेलाच आहे. वेंगुर्ल्याच्या हद्दीवरच तो पोलीस हलधरना हा सर्व खुलासा सांगून तो हातरुमाल मागून घेईल व पुन्हा जरूर तेव्हां साक्षीस येण्याच्या कबुलीवर त्यांना सोडून देईल. तुम्ही त्यांच्या... ''

'' पत्नी...हो मी त्यांची पत्नी आहें ! '' असें म्हणून शैला तोंड झाकून घेऊन लहान पोरासारखी ओक्साबोक्शीं रुद्ध कंठानें, दबलेल्या आवाजांत रडूं लागली.

बराच वेळ ती रडत राहिली होती.

'' तुम्ही त्यांची पत्नी ? '' असें आश्चर्यानें पोलिसानें विचारलें. पण तें तिनें ऐकलेंच नव्हतें. पहिला शोकावेग ओसरल्यावर ती थोडीशी भानावर आली.

'' बाळासाहेब कुठें गेले आतां ? '' तिनें विचारलें.

'' बाळासाहेब ना ? ते आपल्या गांवींच जायला निघालेले असणार. सरकारनें नेमलेल्या औद्योगिक चौकशी मंडळाचे ते सभासद. लोकांत आणि सरकारांत केवढी मान्यता त्यांची ! केवढा दिलदार स्वभाव त्यांचा ! त्यांची-माझी दुरून ओळख. प्रत्यक्ष परिचय फार नाहीं त्यांच्याशीं. पण तुम्ही इथें कशाला—म्हणजे कशा आलांत ? आणि आतां पुढें काय करणार आहांत ? हरकत नसली सांगायला, तर...''

'' मी तुमचे फार आभार मानतें. मलाही घरीं जायचं आहे. मोटारी केव्हांशा मिळतील ? ''

'' आतां बोट आलीच आहे बंदरांत. एका तासांत मोटारी सुटतील. पण तो तेवढा ओव्हरकोट पाहिजे आम्हांला. ''

शैलानें तो फेकूनच दिला.

ती लज्जेनें अगदीं शरमून गेली होती.

'' शेखरवर एकच आरोप नाहीं चोरीचा, '' पोलीस शैलाला सांगूं लागला, '' त्यानें मुंबईतील युरोपियन डॉक्टरांस भेटून कायद्यानें निषिद्ध अशा कांहीं औषधी जवळ बाळगल्या आहेत. त्यांचा उपयोग त्यानें कांहींजणांवर केलेला आहे. कोणा एका बाईला त्यानें दुसऱ्या एका बाईच्या मदतीनें कसलंसं औषध पाजून, तिला स्वायत्ततेला पारखी करून, तिची सही एका विम्याच्या कागदावर घेऊन तिला लुबाडली आहे, असंही नुकतंच बाहेर फुटलं आहे. '' इतकें बोलून तो पोलीस शैलाकडे शोधक व भेदक मुद्रेनें पाहूं लागला.

शैलाला भुईच्या फटींत गडप होऊन जावेंसें वाटूं लागलें. पण सीतेला उदरांत ठाव देणारी धरणीमाता आपल्यासारख्या नादान मुलीला पोटांत कशी घेईल, असें तिला वाटलें.

" तुम्हांला घरीं पोचवण्याची व्यवस्था आम्ही करतों " तो पोलीस आस्ते आस्ते बोलूं लागला, " पण जातांना वाटेवरच तुम्हांला थोडंसं थांबावं लागेल. अशा बदमाषाला पकडायला तुमच्याकडील कांहीं माहितीची गरज आहे. न्यायाच्या कामाला मदत करायला तुम्ही कांकूं करणार नाहीं, अशी आमची खात्री आहे... "

बाहेरचीं कांहीं माणसें खोलीच्या दरवाजावर गर्दी करीत होतीं. खोलीचें दार उघडेंच होतें. एक पोलीस ती गर्दी दूर करीत होता.

" अवश्य. मला ठाऊक असेल तें सर्व मी सरळ सांगून टाकीन. पण मला आतां लवकर घरीं जाऊं दे. बाळासाहेब पोचतील त्यांच्याबरोबरच मला घरीं पोचतां आलं पाहिजे. "

" त्याबद्दल आपण निष्काळजी असा. ती सर्व जबाबदारी आमच्यावर. मग तर झालं ? काय तुमचं घेतलं पाहिजे ? ही बॅग. आणखी काय ? "

आणखी कांहीं नव्हतेंच. शैला आणि तो पोलीस एका मोटारींत बसलीं. मोटार भर्रर्रकन् निघून गेली.

हलधरला घरीं यावयाला संध्याकाळ झाली. तो सावंतवाडी व कुडाळ येथें कांहीं वेळ थांबला होता. आपल्या कामाधामाच्या कांही गोष्टी त्याला पुऱ्या करावयाच्या होत्या. संध्याकाळीं तो घरीं आल्यावर प्रथम आपल्या आईला भेटला. ती आंथरुणांतच निजून राहिली होती. सर्व माणसें घाबरून गेल्यासारखीं दिसत होतीं. कोणाच्याही चर्येवर तजेला नव्हता.

बाईनीं हलधरच्या चेहेऱ्याकडे नुसतें पाहिलें. त्यांना सर्व प्रकार उलगडला. बाळ उदासवाणा आहे हें त्यांनीं ओळखलें. अर्थात शैला आली नाहीं हें निराळें विचारायला नको आणि सांगायलाही नको.

बाईनीं बाळाला जवळ बोलावला. हलधर जवळ गेला. त्याचें बाईनीं अवघ्राण केलें. त्याच्या मस्तकावरून हात फिरविला आणि त्यांनीं तोंडावर पांघरूण ओढून घेतलें. हलधर उठून माडीवर गेला. आईकडून कुरवाळून घेण्याचीच त्याची मनीषा होती,

ती कशी पुरी करून घेतां येते ह्याची त्याला काळजी पडली होती, ती अशा रीतीनें दूर झाली.

हलधरनें माडीवर जाऊन कांहीं कागदपत्र लिहिले. कांहीं पत्रें लिहिलीं. नंतर तो बराच वेळपर्यंत बुट्टोजीबरोबर बोलत राहिला होता. बुट्टोजीला कितीतरी टांचणें लिहून घ्यावीं लागलीं त्यावेळीं. शेवटीं बुट्टोजीला त्यानें कांहीं जरूरीच्या कामासाठीं डॉक्टरकडे पाठवून दिलें.

तो आपल्या आवारांत फिरून आला. चोहींकडे भकास दिसत होतें. धाकजी आणि त्याची बायको आपल्या घरांत राहायला गेलीं होतीं. तीं दोघेंही हलधरची व शैलाची वाट पाहात राहिलीं होतीं असें ऐकून हलधरला आनंद झाला.

हलधरनें आपलें टपाल पाहिलें. आलेल्या नियतकालिकांचे अंक चाळून पाहिले. एका मासिकांत त्यानें प्रकाशनासाठीं पाठविलेला लेख छापून आला होता, त्याच्यावरून त्यानें नजर फिरविली. त्यांतील कांहीं मजकूर ठळक जाड्या अक्षरांत छापलेला होता. ‘आपण त्या ओळी अधोरेखांकित केल्या नसतां संपादकानेंच त्या मोठ्या अक्षरांत कां छापल्या ?’ तो कुतूहलानें त्या ओळींवरून नजर फिरवूं लागला.

“... क्षेत्र आपण पवित्र मानतों व क्षेत्रावरील पुजाऱ्यास वंदनीय समजतों. पण क्षेत्रावर काय प्रकार चालतो, हें कांहीं कोणाला उघड करून सांगायला नकोच. खरें म्हटलें तर कृषिभूमि हेंच खरें जागतें क्षेत्र. शेत हा क्षेत्र शब्दाचाच अपभ्रंश आहे. शेतकरी हे भूमिसेवा करून जीवमात्राच्या अन्नाची सोय करतात म्हणून ते पवित्र होत. ते जर प्रामाणिकपणानें वागतील तर क्षेत्रावरील पुजाऱ्यांपेक्षां अधिक आदरणीय होतील. माझें आयुष्य किती वर्षें असेल हें कांहीं मला माहीत नाहीं. पण माझ्या आयुष्यांतील प्रत्येक क्षण भूमिसेवेंत आणि जनसेवेंत जावा अशी माझी इच्छा आहे. अशा प्रकारचे पूज्य शेतकरी हेच हिंदुस्थानचे उद्धारक होणार आहेत. हिंदुस्थानचा उद्धार शिपायांच्या बंदुकांनीं अथवा लेखकांच्या लेखण्यांपेक्षां शेतकऱ्यांचे नांगरच अधिक भरीवपणें घडवून आणतील. सुशिक्षित शेतकरी हाच हिंदुस्थानचा खरा उद्धारकर्ता होय ...”

इतका मजकूर जाड्या टाइपांत छापलेला होता. तो मजकूर वाचून स्वतः हलधरच्याच आंगावर शहारे आले. तो डोळे मिटून गप्प बसला. ‘माझें आयुष्य किती वर्षें असेल

हें मला माहीत नाहीं ' ह्या ओळीच्या पुढें काकपदाचा शोध घालून तेथें त्यानें लिहून ठेवलें, " तें दोन तीन तासच आहे "

तीं अक्षरें त्यानें लिहिलीं आणि तो स्वतःशींच हसला.

नंतर तो उठून आपल्या झोपावयाच्या खोलींत गेला. श्रीदत्तात्रेयाची मूर्ति होती तशीच होती. त्यानें तिला भक्तिपूर्वक नमस्कार केला.

टेबलावर लिहून ठेवलेला एक लिफाफा त्यानें आपल्या खिशांत घातला. गांवांतून जाऊन येतों असें गड्याकडे बोलून तो काळोख पडण्याच्या सुमाराला घराबाहेर पडला.

पुन्हा त्याचे पाय मागें परतले. गोठ्यांत त्याची एक गाय आवडती होती. आपल्या हातानें तो तिला पेंडीचा घास देत असे. त्या गाईला घास दिल्याशिवाय त्याच्यान जाववेना. एक पेंडीचा खडा घेऊन तो गोठ्यांत गेला. गाईच्या तोंडांत त्यानें पेंडीचा घास दिला आणि तिच्या पाठीवरून हात फिरविला. लगेच तो गोठ्यांतून निघाला.

त्याची पाठ फिरली मात्र. गाईनें हंबरडा दिला !

तो निघून गेल्यावर पांच दहा मिनिटें गेलीं असतील इतक्यांत एक मोटार फाटकांतून आंत शिरली आणि शैला खालीं उतरली.

उतरल्याबरोबर ती प्रथम बाईंना भेटावयाला गली.

तिला पाहिल्याबरोबर बाई आंथरुणावरच उठून बसल्या. त्यांनीं अन्नपाणी वर्ज केलें होतें. त्यामुळें त्यांना लगेच ग्लानीची मूर्च्छा आली.

शैलानें त्यांना दूध पाजलें आणि प्रथमोपचार करून शुद्धीवर आणलें. त्यांच्या दुःखाला कारण आपणच ही जाणीव असल्यामुळें ती झटकन् उठली आणि माडीवरील आपल्या खोलींत गेली. बाळासाहेबांची चौकशी करतां ते बाहेर गेल्याचें तिला कळलें. त्यांनीं घरांत पाण्याचा घोटही घेतला नव्हता, असेंही तिला समजून आलें.

ती हलधरच्या खोलींत गेली. कांहीं पत्रें पोस्टांत टाकण्यासाठीं ठेविलीं होतीं. एक पत्र बुट्टोजीच्या नांवचें होतें. टेबलावर उघडून टाकलेल्या वर्तमानपत्रावर तिची नजर गेली. तिनें दिवा लावला होताच.

वर्तमानपत्राच्या छापील मजकुरांत तांबड्या शाईत हलधरनें स्वतः लिहिलेला मजकूर तिच्या दृष्टीस पडला. ते शब्द वाचतांच तिच्या डोळ्यांसमोर काजवे चमकले. तिचा धीर गळला. मस्तकावर तिनें हात मारून घेतला. ती मट्कन् खालीं बसली. तिची शक्ति क्षीण झाली होती. पण कोठून तरी तिच्या आंगांत बळ संचारलें.

ती माडीवरून खालीं उतरली.

हातांत दिवा नाहीं, पायांत चप्पल नाहीं, आंगावरील वस्त्राची शुद्ध नाहीं, अशा अवस्थेंत ती एकसारखी काळोखांतून धावतच निघाली. कोणाचेंच लक्ष तिच्याकडे नव्हतें.

फाटकाच्या बाहेर रस्त्यावर आल्यावर ती क्षणभरच तेथें उभी राहिली. कोठें जावें हें तिला सुचेना. हलधर कोणत्या दिशेला गेला हें तिला कोण सांगणार होता? खंबीर मनाचा हलधर आत्महत्या करील हें तिला कधींही खरें वाटलें नसतें. पण जग शून्य झाल्यावर मनुष्य जीवाला कंटाळतो. पण आपण – आपणच त्याचें आनंदी जीवन शून्यवत् करून टाकलें. त्यानें प्रतिज्ञा शेवटपर्यंत पाळली. जी थोडीशी चूकभूल झाली तिचा त्यानें स्वतः भेटून खुलासा केला आणि क्षमा मागितली. आपण कठोरपणानें तीदेखील त्याची विनंति मान्य केली नाहीं, असे विचार शैलाच्या मनांत आले.

' बाळासाहेब ' अशी हाक मारली असतां ती दाही दिशांस जाऊन बाळासाहेबांच्या कानांपर्यंत पोचेल काय? आणि पोचली तरी मागें पाऊल घ्यावयाला लावण्याचें सामर्थ्य त्या हाकेंत असेल काय?

' बाळासाहेब ' हे शब्द उच्चारण्याचा तिनें प्रयत्न केला. पण शब्दच बाहेर उमटेना. घसा कोरडा पडला. ती भिरीभिरी चारी दिशांना पाहूं लागली.

धाकजीच्या घराच्या दिशेनें ती पाहूं लागली. धाकजीच्या बायकोच्या बाबतींत आपण हलधरसंबंधीं किती गैरसमज करून घेतला हें तिला बरेंचसें समजून चुकलें होतें.

धाकजीचें स्मरण होतांच त्यानें ज्या दिवशीं आत्महत्येचा प्रयत्न केला त्यादिवशीं नदींतील भोवऱ्याबद्दल अनेक लोकांनीं काढलेल्या उद्गारांचें तिला स्मरण झालें.

त्या ठिकाणीं नदीला वळण मिळालें होतें. तेथें नदीचा प्रवाह संथ होऊन भोवरा उत्पन्न झाला होता. तो भोवरा म्हणजे काळाचा जबडाच !

शैलानें भ्यालेल्या हरिणीसारखी उडी मारली आणि जिवाची पर्वा न करितां ती नारळीबागेंत शिरली. पायांखालीं कांटेकुटे, दगडधोंडा, कांहीं म्हटल्या कांहीं न बघतां ती काळोखांतून ठेंचाळत पळत होती.

वारा जोराचा सुटला होता. नारळींचीं चुडतें आणि झाडांच्या फांद्या लटलट हालत होत्या. त्यांचा आवाज इतका मोठा होत होता, कीं अगदीं जवळ येऊन कोणी मोठ्यानें बोललें तरी क्वचितच् ऐकूं आलें असतें.

वाळलेलीं पानें भराभर सरकत, उडत, सळसळाट करीत चाललीं होतीं. भरतीचें पाणी वर चढत असल्यामुळें मासे हवेंत उंच उडून पुन्हा पाण्यांत बुडी मारीत, तेव्हां

' खळ्ळक् ' असा केवढा तरी मोठा आवाज होई. नारळाएवढा दगड पाण्यांत उंचावरून टाकला असता तरी तेवढा मोठा आवाज झाला नसता.

हलधरनें आपले कपडे नदीतीरावर काढून टाकले होते. ते वाऱ्यानें उडून जाऊं नयेत म्हणून त्यांच्यावर एक दगड वजनासाठीं ठेवला होता. तरी सदऱ्याचा पांढरेपणा काळोखांत लपला जात नव्हता. जवळपास आल्यावर तो कोणालाही दिसला असता.

हलधर कांचा मारून नदीच्या दरडीवर उभा राहिला होता. खालीं भोवरा गरगर फिरत होता. उडी टाकली, कीं एका मिनिटांत माणूस वळशांत गिरक्या घेत नदीचा तळ गाठायचा हें निश्चित. पोहण्याची विद्या तेथें हातच टेकते. तळ गाठल्यावर खूप वेळानें, पुष्कळ अंतरावर त्या माणसाचें शव तरंगत राहावयाचें !

ज्या पाण्यावर तरण्यासाठीं आपण आजवर प्रयत्न केला, वेगाच्या प्रवाहांतदेखील बुडवूं पाहाणाऱ्या ज्या पाण्याला आपण कधीं दाद दिली नाहीं, पाण्यापासून बचाव व्हावा म्हणून माणसें जी पोहण्याची कला मुद्दाम शिकतात, ती कला आपण उत्कृष्टप्रकारें संपादिली आणि शेवटीं त्याच पाण्याला आपण खात्रीचें मरण मिळण्यासाठीं जवळ करीत, कवटाळीत आहोंत, ह्या दैवघटनेच्या विलसिताची कल्पना त्याला क्षणभर गमतीची वाटली.

शैला अजमासा अजमासानें ठेंचाळत, पडत झडत भोवऱ्याकडे येत होती. तिला पांढरेंशुभ्र असें काळोखांत कांहींतरी दिसलें.

तिनें त्याला स्पर्श करून पाहिला; तो हलधरचा सदरा. जवळपासच हलधर असला पाहिजे असा तिनें तर्क केला.

आकाशांतील असंख्य तारका वरखालीं होणाऱ्या पाण्यावर तरंगत होत्या. पाण्यांत डुंबणाऱ्या तेजाळ तारका जणूं आपल्याला बोलावीत आहेत असेंच हलधरला वाटलें. खालीं भोवऱ्यांतील पाण्याकडे पाहाण्याऐवजीं त्या आकाशांतील चांदण्यांकडे पाहाणेंच त्याला अधिक चांगलें वाटलें. फसव्या तरुणींच्या नयनतारकांपेक्षां त्या तारा कितीतरी पटींनीं श्रेष्ठ. पृथ्वीवरील चंचल वृत्तीच्या प्रमदाप्रेमापेक्षां लुकलुकणाऱ्या तारकांचीं प्रतिबिंबें देखील अधिक विश्वसनीय, असें त्याला खात्रीपूर्वक वाटलें.

म्हणूनच त्यानें आकाशांतील शांत अशा त्या तेजोगोलांकडे नजर लावली. साहजिकपणेंच त्याची छाती पुढें आली आणि मान वर झाली.

नदीच्या पलीकडच्या तीरावर दाट झाडें नव्हतीं. एखादें झाड असलें तर स्वच्छ आकाशाच्या क्षितिजाआड तें पुसटपणें दिसत असे.

शैला जेथें उभी होती तेथें समोरच कंबरेच्या वरची मनुष्याकृति तिला आकाशाआड दिसली.

लगेच ती धावली. हलधर उडी घालणार होता तोंच त्याच्या कंबरेला विळखा पडला !

त्या धक्क्यानें तो घसरला आणि दोघेंही जमिनीवर पडलीं. पण शैलानें पकड सोडली नव्हती.

हलधरनें काळोखांत चाचपडून पाहिलें. ती शैलाच होती.

" तूं गेली नाहींस ? " त्यानें मोठ्या कष्टानें विचारलें.

" नाहीं. मी तुम्हांला सोडून कधींही जाणार नाहीं. कुठेंही नाहीं जाणार. माझी चूक झाली. क्षमा करायची एकदा. "

शैलानें हलधरच्या कंबरेला विळखा घातला असल्यामुळें उजव्या कनवटीस खोवलेलें आपलें मंगळसूत्र तिला स्पर्शावरून ओळखतां आलें.

" हें माझं मंगळसूत्र मी काढून टाकलं. तें आतां ह्याच क्षणीं आपल्या हातांनीं माझ्या गळ्यांत बांधायचं. आणि आपण दोघांनीं बाईंनां नमस्कार करून त्यांना उठून बसवायचं. त्यांच्या डोळ्यांच्या धारा खळल्या नाहींत. मला किनई पश्चात्ताप झालाय्. माझ्यानें बोलवत नाहीं ! आतां आपण घरीं जाऊं..."

हलधर पाय सोडून दोन्ही हात मागून जमिनीला टेकून अर्धवट उताणा पडल्यासारखा कलला होता. शैलाचा विळखा अर्थातच सैल पडला. पण तिनें आपला डावा हात हलधरच्या डाव्या हाताखालून त्याच्या छातीवर नेला होता आणि उजवा हात उजवीकडून त्याच्या पोटावरून कंबरभोवतीं घातला होता. तिनें डावा पाय आंखडून घेतला होता व उजवा पाय मोकळा लांब सरळ सोडला होता. हलधरचे हात घसरून त्याचें मस्तक शैलाच्या डाव्या मांडीवर टेकलें.

स्वाभाविकपणेंच त्यामुळें शैलाचा डावा हात मोकळा झाला. डाव्या हाताचीं बोटें ती हलधरच्या केसांमधून व कपाळावरून फिरवूं लागली.

हलधर तसाच राहून आकाशांतील तारकांकडे पाहात होता. त्याचें सर्वांग सुखातिशयानें बधिरलें होतें. आकाशांतील अगणित तारका मिस्किलपणानें डोळे मिचकावून त्याच्याकडे पाहात व हसत होत्या, कारण सोसाट्याचा वारा शैलाचा पदर उडवीत होता आणि थंडींत उघड्या आंगानें पडलेल्या हलधरवर शैला वाकून त्याच्यावर आपल्या सुकुमार आंगाचें आवरण घालीत होती.

